# ISLAM EK MADHUR UPAHAR

# इस्लाम एक मधुर उपहार

* लेखक *

मो. फारुक खान (एम.ए.)

* भाषांतर *

जाहिद आबिद खान

# अनुक्रमणिका

*॥ अल्लाह असीम दयावंत व कृपावंत च्या नावाने ॥*

# दोन शब्द

इस्लाम एक गंभीर विषय आहे मात्र तो मानवतेच्या दृष्टीने अत्यंत सरळ व सुलभ विचार आहे. आमच्याच दुर्लक्षतेमुळे इस्लाम हा अगम्य व वादग्रस्त धर्म झाला आहे. इस्लाम हा त्याच्या वास्तविक स्वरुपात देशवासियांसमोर मांडण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहोत, जेणेकरुन ते लोकांना सहजरित्या लक्षात येऊ शकेल व त्याबाबत योग्य ती धारणा कायम करता येईल. हे काम अत्यंत विस्तृत व व्यापक आहे. ईश्वर आम्हास शक्ति व बुद्धि प्रदान करो.

या पुस्तकात असे काही लेख संग्रहित करण्यात आले आहेत ज्यात इस्लामच्या कोणत्या ना कोणत्या तत्वाबाबत खुलासा दिला गेला आहे. बहुतेक लेख हिंदु विद्वानांनी लिहिले आहेत. त्यांनी अत्यंत उदार मनाने नि:पक्षपातीपणे आपले विचार मांडलेत. यापैकी बहुतेक लेख साप्ताहिक 'क्रांति' (दिल्ली) मध्ये प्रकाशित झाले आहेत. आम्हाला आशा आहे की वाचक या पुस्तकातील लेखांचे खुल्या मनाने अध्ययन करतील. सत्य कोणत्याच एका व्यक्ति व सामाजिक गटाची मिळकत नाही. सत्यावर सर्वांचा समान अधिकार असतो व त्याचा सर्वांनी आदर करायला हवा.

विनीत

**मुहम्मद फारुक खाँ**

# धर्मभावना

व्यक्तीचे वास्तविक मूल्य, त्याचा सम्मान व परोक्ष सत्तेशी त्याच्या संबंधांच्या भावनेवर धर्माची भावना आधारित असते. व्यक्तीचे व्यक्तित्व, व्यक्तिगत सम्मान व त्यांना झालेले परमात्म्याचे दर्शनाच्या फलस्वरुपानेच धर्माच्या भावनेचा उदय होतो. हेनरी कार्सनि योग्यच लिहिलंय की मानवाने समाजात समानरित्या व्याप्त असलेल्या परमात्म्याकडे पहावे, त्याची झलक, सर्वांनाच दिसू शकते, तिनेच जगातील युद्ध संपुष्टात येईल... धर्मच अशी बाब आहे जी अंत:करणाला स्पर्श करते, धर्माच्या शक्तिने पापभावनेशी संघर्ष करणे शक्य होते. लोभ, लालसा, घृणा इत्यादिपासून आमची रक्षा होते. आम्हाला नैतिक बल प्राप्त होते व जगाचे संरक्षण करण्याचे अपेक्षित धाडस प्राप्त होते. धर्म-भावनेचा अर्थच असा आहे की आम्ही सत्याच्या अपेक्षेनुसार आपल्या विचारांना स्वरुप द्यावे व त्यानुरुप आचरण करण्याचे प्रयत्न करावे.

**डॉ. राधाकृष्णन्**

# इस्लाम

हृदयचेतनेचा मधुमय आभास तुला जगाने मानले. ज्ञानीजनाची ज्ञानज्योति तू, जीवनाचे सुख साध्य नियम तू, लहरींच्या चंचलतेने व्याकुळ होऊन तुझी परिभाषा केली, दाखविला जीवनाचा सत्य, सुंदरम्, शिवम् मार्ग.

संपादक

# इस्लाम पूर्व अरबस्तानची परिस्थिति

मुहम्मद फारुक खाँ

हजरत ईसा (अ.) नंतर जवळ जवळ सहाशे वर्षापर्यंत एकाही प्रेषिताचे पृथ्वीवर आगमन झाले नाही. श्री रामचंद्र, श्रीकृष्ण व गौतम बुद्ध यांचा काल हजरत ईसा (अ) (येशु ख्रिस्त) यांच्या पूर्वीचा होता. ईराणचे जरतुश्त व चीनचे कन्फ्युशस हे सुद्धा प्राचीन काळात होऊन गेलेत. येशु ख्रिस्ताच्या नंतर धर्माची दुर्दशा झाली होती. जरतुश्तच्या काळात एकाच ठिकाणी दोन ईश्वराची कल्पना रुजली गेली होती. दोहोंपैकी एक सदाचाराचा ईश्वर होता व दुसरा दुराचाराचा ! मजकदिया (जंर, जत, जमीन) धन, धरती व नारीला सामुहिक संपत्ती मानून समाजाला व्यभिचाराच्या मार्गावर आणले होते. जवळपास चीनमध्ये हीच सामाजिक दुर्दशा अस्तित्वात होती. भारतात मूर्तिपूजेचे प्रस्थ होते. हजारो देवी-देवतांची पूजा केली जात होती. दुष्कर्म व अपप्रवृत्तींचा प्रसार झाला होता. सूर्य, चंद्र, वृक्ष, नदी, माती, दगड, पशु इत्यादिंची पूजा केली जात असे. सहाव्या शतकात ख्रिस्ती धर्मीय एका ऐवजी तीन ईश्वरांची प्रार्थना करीत असत. चर्चमधील पादरी लोकांची (ख्रिस्ती धर्मगुरुंचे) वर्तन अत्यंत घृणास्पद होते. काही धर्मगुरु सदाचारी होते मात्र बहुतेक पथभ्रष्ट झाले होते. ते समाजात ब्रह्मचारी म्हणून वावरण्याचे ढोंग करीत मात्र गुप्तपणे व्यभिचारी कृत्ये करीत असत. एका ख्रिस्ती धर्मीय व्यक्तिने लिहिले आहे की ख्रिस्ती लोकांच्या आपापसांतल्या भांडणाने ख्रिस्ती धर्माचा सर्वनाश करुन टाकला होता. ख्रिस्ती धर्मगुरुंकडे आपल्या पापांची कबूली-जबाब (True Confession) देण्याकरिता आलेल्या कुमारिकांना बेअब्रू होऊन जावे लागे. सर विल्यम मूरने म्हटलंय की ई.स.च्या सातव्या शतकांत ख्रिस्ती धर्माची दुर्दशा झाली होती. ख्रिस्ती धर्मातील विविध गटांनी धर्माच्या नांवाने भांडणे

उकरुन काढून धर्म जवळपास नेस्तनाबूत केला होता. प्रोफेसर लीन यांनी लिहिले आहे की तत्वज्ञान शास्त्राने ख्रिस्ती धर्मातच नव्हे तर संपूर्ण पौरवात्य देशाच्या धर्मांवर दुष्परिणाम घडवून आणले होते. मध्य व पूर्व आशियातील देशातील सर्वच धर्मीय मूर्तिपूजक झाले होते.

सारांश, सर्वत्र मूर्तिपूजा प्रचलित झाली होती. पवित्र धर्मग्रंथात महान ऋषिमुनींना व्यभिचारी असल्याचे सांगण्यात येत असे. काल्पनिक कथांद्वारे त्यांना इतके घाणेरडे स्वरुप दिले जात होते की, सज्जन माणूस ते व्यक्त करण्याचे धाडस करू शकत नव्हता. शकतक मत व बाममार्गी तत्कालीन धार्मिक समुदाय होते. स्त्री-पुरुषांचे गुप्तागांचे नग्नचित्र मंदिरात ठेवले जात असत व त्यांची पूजा केली जात असे. जगातील तुच्छ मानल्या जाणाऱ्या वस्तूंसमोर लोक नतमस्तक होत असत. सर्वत्र कुकर्मांचा तिमिर प्रसरला होता.

अरब टोळ्यांमध्ये सभ्यता व सौजन्य नाममात्र ही शिल्लक राहिली नव्हते. हे उंट चारणारे व तंबूत राहणारे जगावेगळे लोक होते. त्यांचा कोणी राजा नव्हता व शासनव्यवस्थेशी त्यांचे काही घेणे देणे नव्हते. ते कोणाचेही अधिपत्य स्वीकारत नसत. लूटमार करणे, जुगार खेळणे, मदिराधीन राहणे यातच ते व्यस्त असत. ते कमालीचे भांडखोर होते. क्षुल्लक क्षुल्लक कारणावरुन एक टोळके दुसऱ्या टोळक्यावर तुटून पडत असे. एकदा सुरु झालेले भांडण शेकडो वर्षापर्यंत चालू राहत असे. ते अंधविश्वासग्रस्त होते. प्रत्येक टोळीची एक मूर्ति होती. तिच्या पुढ्यात ते नैवेद्य ठेवून मूर्तिला प्रदक्षिणा घालीत. त्यांच्याकडे कोणताच धर्मग्रंथ नव्हता. काल्पनिक गोष्टींवर श्रद्धा ठेवत असत. व्यभिचारावर त्यांना गर्व वाटत असे. त्यांच्या गप्पांचा विषय व्यभिचाराची कृत्ये असे. त्यांच्या काव्यात कामवासनेचे वर्णन असे. आपल्या कवितेत ते आपल्या स्त्रिया व प्रेयसीच्या सौंदर्याचे

वर्णन करीत असत. अरबस्थानातील प्रसिद्ध कवि आपल्या आत्ये बहिणीशी केलेल्या कामक्रिडेवर लिहिलेल्या रोचक कविता लोकांना वाचून दाखवीत असे. अरबांत कांही चांगल्या सवयीही होत्या. ते पाहुण्यांचा सत्कार करीत, आपल्या जातीय व वंशाच्या लोकांचा आदर करीत. ते अत्यंत धाडसी, शूर, दानशील होते. ते प्रवाशांना आश्रय देत. पण कधी कधी वाटसरुंची लूटमार ही करीत. घोड्याच्या शर्यीवरुन वा त्यांना पाणी पाजण्यावरुन दोन टोळ्यांमध्ये दीर्घकालापर्यंत हाडवैर कायम राहत असे. जुगार व मद्यपानाच्या बाबतीत ते आजच्या पाश्चात्य लोकांपेक्षा वरचढ होते. जी व्यक्ति जुगार खेळत नसे त्या व्यक्तीस कंजूस म्हटले जात असे. सर्वांच्याच घरांत दारुने भरलेली मडकी असत. मूर्तिवर मद्याचा अभिषेक केला जात असे व प्रसाद म्हणून मद्य पाजले जात असे.

स्त्रियांशी त्यांची वागणूक चांगली नव्हती. एका बाईवर अनेक पुरुषांचा डोळा असे. युद्धांत पकडल्या जाणाऱ्या उच्च घरातल्या महिलांना दासी म्हणून वागविले जात असे. त्यांना वेश्या व्यवसाय करायला लावत व त्यांच्याकडून उत्पन मिळवीत. स्त्रियांना ते आपली मिळकत समजत. दासींशी मालक स्वतः विवाह करीत असे, किंवा दुसऱ्या पुरुषाशी लग्न लाऊन देत असे. एवढेच काय, आपल्या वडिलांच्या बायकांना आपली मिळकत समजून त्यांच्याशी विवाह करुन घेत असत. पति पत्नीस वाटेल तेव्हा घटस्फोट देत असत व वाटेल तेव्हा पुन्हा तिच्याशी विवाह करुन घेत असत. एकाच वेळी एक पुरुष वीस-पंचवीस स्त्रिया बाळगत असे व मनांत आले की सर्वांना सोडून देत असे.

बाप आपल्या मुलींना जिवंत गाडून टाकीत असे. विवाहाच्या वेळी पत्नीशी करार केला जात असे की जर मुलगी जन्माला आली तर तिला ती स्वतः ठार करील व ठरल्याप्रमाणे मुलीला टोळीच्या स्त्रियांसमोर ती ठार

मारीत असे. एका सहाबीने (प्रेषिताच्या सहकार्याने) स्वतःच्या भूतकालीन जीवनाबद्दल सांगितले होते की, त्याने इस्लाम धर्माचा स्वीकार करण्यापूर्वी आपल्या पांच वर्षाच्या सुंदर मुलीला जंगलात नेले. तेथे तिला जिवंत पुरण्यासाठी खड्डा खणण्यास सुरुवात केली. त्याच्या कपड्यांवर जी माती पडत होती ती तिच्या कोमल हाताने स्वच्छ करीत होती. शेवटी त्यांने तिला निर्दयपणे खड्ड्यात पुरुन ठार केले!

अरब भूतप्रेतांवर विश्वास करीत असत. आजार झाल्यास ते किन्नरांकडे जात. जादूटोना, तंत्रमंत्राद्वारा उपचार करुन घेण्याचा प्रयत्न करीत. ज्योतिष व भविष्यवाणी करणाऱ्यांवर विश्वास करीत. मक्केजवळ उकाज या ठिकाणी जत्रा भरत असे, तेथे अरब टोळ्या गोळा होत. जुगार खेळत, मद्यप्राशन करीत, जनावरांचे बळी देत. कधी कधी एखाद्या कैद्याचा मानवी बळी दिला जात असे. सायंकाळी रंगदार कविसंमेलन आयोजित केले जात असे. आपल्या कवितेत व्यभिचारी कथानक लोकांना ऐकवीत. ज्या स्त्रियांशी त्यांचे प्रेमसंबंध असत त्यांनाच ते सर्वांसमक्ष बदनाम करीत. स्त्रिया सुद्धा अर्धनग्नावस्थेत डफ वाजवून नृत्य करीत व त्यांच्या प्रेमकृत्यांचे वर्णन ऐकून ते खुश होत. जी स्त्री आपल्या टोळीपासून दूर जात असे ती गुंडाच्या तावडीत पकडली जात असे. तिच्याकरिता गुंड आपसात मारामारी करुन एकमेकांचे रक्त सांडत असत. सकाळी शुद्धीवर आल्यानंतर ते चौकशी करीत की रात्री ते कशासाठी मारामारी करीत होते!

# इस्लामचा संक्षिप्त परिचय

*मुहम्मद फारुक खाँ*

इस्लाम केवळ धर्म नसून हा एक जीवन मार्ग आहे. एक विस्तृत व प्रशस्त मार्ग आहे, असे ही म्हणता येईल की हाच जीवनाचा एकमेव मार्ग आहे. इस्लाम जीवनाची आचारसंहिता आहे. केवळ वैयक्तिक जीवनाचीच नव्हे तर सामुहिक जीवनाची आचारसंहिता आहे.

इस्लाम सिद्धांतावर आधारित आदर्श जीवन मार्ग आहे. हा केवळ कल्पनाविलास नसून त्यानुसार प्रत्यक्ष जीवनाचा मार्ग आखता येतो व आदर्श जीवन जगता येते. कारण इस्लाम हा प्रत्यक्षात येणारा व्यावहारिक आदर्श जीवन मार्ग आहे.

इस्लाम एका प्रकारचे आंदोलन आहे. त्याच्या नियंत्रण व निर्धारण शक्तीने आपले कायमस्वरुपी अस्तित्व निर्माण केले आहे. इस्लाम सिद्धांताच्या मूल्याच्या बाबतीत कोणतीच तडजोड करीत नाही. मात्र काळ व स्थानाच्या परिवर्तनानुसार गतिशील होण्याची त्यात निश्चितच क्षमता अस्तित्वात आहे.

संक्षिप्त शब्दात सांगायचे झाल्यास इस्लाम मध्ये उपरोक्त बाबींचा समावेश आहे. हाच एकमेव खरा धर्म आहे. ज्याला कुरआनात "दीन" (परिपूर्ण जीवन पध्दती) म्हटले आहे.

इस्लाम प्रत्यक्षात आचरणात आणायला हवा. इस्लाम आपल्या दैनिक जीवनात प्रकट झाला पाहिजे. इस्लाम मनुष्याच्या वैयक्तिक जीवनासह, पुत्र व कन्या, बंधू व भगिनी, पती व पत्नी, माता व पिता, आजोबा व आजी या सर्व नात्यात तसेच सामाजिक क्षेत्रात एक नागरिक, एक शेजारी व संपूर्ण जगाच्या विश्वबंधुत्वाच्या तत्वाने जोडलेल्या सदस्यांना बल प्रदान करतो. इस्लाम केवळ तत्वज्ञान नसून ते प्रत्यक्ष कर्म आहे. इस्लामला तत्वज्ञान सिद्ध करण्यात आम्ही व्यर्थ वेळ नष्ट करीत असतो. त्याच वेळेचा आम्ही इस्लामच्या अपेक्षेनुसार स्वतःस त्या अनुरुप तयार करण्यासाठी उपयोग करायला हवा.

इस्लामची प्रत्येक मुस्लिमाकडून अपेक्षा आहे की त्याने आपल्या कर्तव्यांचे पालन इस्लाम अनुसार करायला हवे. इस्लामवर निष्ठा असणे म्हणजे ईश्वर व सृष्टीच्या बाबतीत आपल्या कर्तव्यांचे पालन होय.

इस्लाम ईश्वर व मनुष्य दोहोंना एकत्र आणतो व दोहोंमध्ये जवळीक निर्माण करणे म्हणजेच एका निष्ठावान (मुस्लिम) व्यक्तीच्या जीवनास आदर्श रुप प्राप्त करुन देणं होय.

दूर्दैवाने आज आमच्या जीवनातले संतुलन नाहिसे झाले आहे आम्ही आपल्या जीवनात अधिक सामंजस्य निर्माण करायला हवे.

इस्लामने केवळ काही सिद्धांत व तत्व प्रस्तुत केले नसून एक समाजव्यवस्था ही निर्माण केली आहे. ती इस्लामच्या सिद्धांत व आदर्शांना मूर्त स्वरुप प्रदान करते. इस्लामच्या नैतिक व सामाजिक न्याय व्यवस्थेच्या आधारशिलेवर उभारलेले सिद्धांत व आदर्शाने अनुशासनबद्ध सत्यवादी, न्यायप्रिय समाजनिर्मिती केली व मुस्लिमांना अंधकारमय जागतिक परिस्थितीत नाविन्यपूर्ण सामर्थ्यशाली नेतृत्व प्रदान केले. आता आम्ही दीर्घकालीन गाढ झोपेतून जागे व्हायला हवे. ईश्वराच्या अंतिम प्रेषिताने आम्हापर्यंत पोहचविलेल्या शक्तिशाली इस्लामच्या आधारे पुन्हा एकदा आदर्श व उच्चस्तरीय जीवनमार्गांचा अवलंब करुन सर्वोच्च नेतृत्वास आम्ही पात्र व्हायला हवे.

इस्लाम सार्वभौमिक व सर्वकालिक धर्म आहे. इस्लाम कोणत्याही एका सामाजिक गट अथवा क्षेत्रापुरता मर्यादित नसून त्याची सर्व तत्वे स्थायी व सर्वव्यापी आहेत. इस्लाम सर्वकालिक आहे कारण याची तत्वे प्रत्येक युगात प्रत्यक्ष जीवनात अंमलात आणली जाऊ शकतात. इस्लाम ज्ञानाचा प्रशस्त मार्ग सदासर्वदा उघडा ठेवतो. मानवी विवेकशक्ति अविरत कार्यरत राहते. साफल्याच्या नव्या दिशा व नवे क्षेत्र उपलब्ध करुन देतो. एवढेच नव्हे तर मनुष्याला प्रोत्साहित करुन विजयानंतर विजय प्राप्त करण्याचे आवाहन करीत असते. सूर्य, चंद्र, नक्षत्र व तारका सर्व मानवाच्या सेवेत आहेत. त्यावर ही मानवाने विजय प्राप्त करावे अशी इस्लामिक अपेक्षा आहे. या सर्व मानवी साफल्याने मनुष्य ईश्वराचा विशेष प्रतिनिधी म्हणून पृथ्वीवर स्थान प्राप्त करु शकला आहे.

इस्लामपासून दूर जाण्याऐवजी त्याच्या अधिकाधिक जवळ जाण्यातच मानवास कल्याण प्राप्त होऊ शकेल. मानवाने खऱ्या अर्थाने इस्लामचा अवलंब करायला हवा. इस्लामला लोक विकृत स्वरुप देत आहेत व सर्वत्र इस्लामिक वातावरणांस दूषित व घाणेरडे स्वरुप देण्याचे गलिच्छ प्रयत्न केले जात आहेत.

आम्हास इस्लामच्या माध्यमातूनच अमृत संजीवनी प्राप्त करायची आहे. आम्हाला इस्लामवरील विवेकपूर्ण विश्वासाने न्यायपूर्ण व्यवहाराने पुन्हा एकदा सम्मानजनक स्थान प्राप्त करायला हवे. आम्ही विघटनास कारणीभूत ठरणाऱ्या वादविवादापासून अलिप्त राहायला हवे. इस्लामच्या मार्गदर्शनानुसार आपले दैनिक जीवन व्यतीत करुन इस्लामच्या आदर्शांना पुन:स्थापित करायला हवे व याकरिता श्रद्धा व सत्कर्माच्या सामंजस्याद्वारे सिद्ध करायला हवे की आम्ही महान धर्माचे भाग्यवान अनुयायी आहोत. श्रद्धा व सत्कर्म हेच इस्लामरुपी किल्ल्याच्या आधारभूत शिला आहेत.

मनुष्य इस्लामच्या तत्वानुसार जीवन व्यतीत करुन स्वत:चे स्थान उंचावतो. याच धर्माने मानवाला मानवाच्या गुलामगिरीतून मुक्त केले आहे. ईश्वराने माणसाला बुद्धि, विवेक व ज्ञान प्रदान करुन सृष्टीतले सर्वोच्च स्थान देऊ केले आहे. मनुष्य ईश्वराची सर्वोत्कृष्ट निर्मिती आहे. तो आपल्या बुद्धिच्या आधारे चांगले, वाईट, सत्यासत्य, न्यायान्याय, वैधावैधातले अंतर जाणू शकतो. ईश्वराने मानवाला हय्या अलल फलाह(अर्थात सफलतेकडे या) या हाकेकडे आकर्षित होऊन इहलोकात तसेच परलोकात कल्याण प्राप्त करण्याची विवेकबुद्धी प्रदान केली आहे. अजान मानवाच्या कल्याणाच्या शुभचिंतेची हाक आहे. संपूर्ण मानवजातीच्या कल्याणाच्या शुभचिंतेची हाक आहे. संपूर्ण मानवजातीच्या कल्याणाची चिंता तिच्यात निर्हित आहे. प्रत्येक मुस्लिमाच्या जीवनाचे ही शुभ चिंताच ध्येय आहे. प्रत्येक मुस्लिमाने आपल्या परीने थोडेफार का होईना, मानवाच्या कल्याणासाठी योगदान देण्याचे प्रयत्न करायला हवे. मानवतावादी व अद्वैतवादी या पलिकडे जाऊ शकतात काय ?

इस्लामचा अर्थ आहे 'शांति' याचा दुसरा अर्थ आहे 'नमन'. मात्र मनुष्याला नव्हे, केवळ ईश्वराला. ईश्वर म्हणजे जो सृष्टीचा सृजनकर्ता व

संरक्षक आहे. इस्लामनुसार ईश्वर समस्त विश्वातील सर्व शक्तींचा स्त्रोत आहे. इस्लामनुसार त्याच सर्वशक्तिमान ईश्वराला नमन करुन जगात कल्याण व शांति प्राप्त होऊ शकते. शांति व सांमजस्याच्या धर्माने विविध विचार करणाऱ्यांना "शुभचिंते" चा उपहार प्रदान केला आहे.

इस्लामच्या उच्च उद्देशांपैकी "सहानुभूति" एक उद्देश आहे. इस्लामध्ये 'सहानुभूति' या शब्दाच्या अर्थाचा फार मोठा विस्तार आहे.

कुरआनची अपेक्षा आहे की ज्या गोष्टी आम्ही करीत नाही त्या बोलू नये. आपल्या शब्द व कृतिमध्ये एकरुपता असायला हवी. आपण कुरआनच्या आदेशानुसार जीवन व्यतीत करीत आहोत कां ?

कुरआन आम्हास त्या सर्व कामात सहभागी होण्याचा आदेश देतो जे उचित व सदोद्देशाने केले जातात व अशा सर्व कामांपासून परावृत्त करतो जे अनिष्ट व अपायकारक असतात. आम्ही वैयक्तिक वा सामुहिकरित्या या आदर्श नियमांचे पालन करतो कां ? जर पालन करीत नाही तर कां करीत नाही ?

कुरआन, जे सत्य आहे त्यास स्वीकारण्याचा व असत्य आहे त्यास त्यागण्याचा आम्हाला आदेश देतो. या सुवर्ण-संदेशाचा आम्ही जीवनांत स्वीकार करतो कां ? जर करीत नाही. तर कां करीत नाही ?

उपरोक्त सर्व गोष्टी म्हणजे इस्लामचा गाभा आहे. जर आम्ही त्यांचा सम्मान करीत नाही तर त्यात इस्लामचा कोणता दोष आहे ? आम्हाला थोडे विनम्र व्हायला हवे. आम्हाला संयम, आत्मविश्वास व मनोबलाचा आधार घ्यायला हवा. तसे केल्यानेच आम्ही स्वत:ला सत्यमार्गावर आणू शकू. सत्यमार्ग म्हणजे ज्या करिता पुन्हा पुन्हा प्रार्थना केली जाते. सत्यमार्ग म्हणजे त्या लोकांचा मार्ग ज्यावर चालणाऱ्यावर ईश्वर दया करतो. तो मार्ग आपल्याकडे येणार नाही, आपल्याला त्या मार्गावर जावे लागेल. प्रतीक्षा कशासाठी करता ? या आपण सर्व पुढे जाऊ या। कुरआनास आपला पथदर्शक (मार्गदर्शक) मानू या व प्रेषित मुहम्मद (स.) यांचे नेतृत्व स्वीकार करुया !

# परमभक्त प्रेषित मुहम्मद (स.)

**नागेश्वर प्रसाद (बी.ए.)**

पर-गुणग्राहकता भारताचे वैशिष्ट्य आहे. काही लोकांनी अजानतेपणात वा जाणूनबुजून याचा गैरफायदाही घेतला असला तरीही सत्यनिष्ठ राहणे व सत्याचा स्वीकार करणे याचा एक गुण आहे. इस्लामच्या बाबतीत भारताचा हाच दृष्टिकोन राहिला आहे. आजही भारतात कितीतरी संस्था भारतीय नेत्यांचे व महापुरुषा प्रमाणेच हजरत ईसा (येशू-ख्रिस्त) व प्रेषित मुहम्मद (स.) ची जयंति श्रद्धेने साजरी करतात. भारतीय हिंदू-मुसलमानाच्या आपसातल्या वैमनस्यामुळे द्वेषाचे वातावरण निर्माण झाले आहे ही सत्य परिस्थिति आहे. त्यामुळे ते एक दुसऱ्या विरुद्ध अपप्रचार करतात.

मी प्रेषित मुहम्मद (स.) चे जीवनचरित्रा बाबत संक्षिप्त माहिती देत आहे. ज्या लोकांना त्यांच्याबाबत खरे ज्ञान प्राप्त नाही असे अज्ञानी व विवेकहीन लोक त्यांच्याबद्दल चुकीचे मत प्रकट करतात.

हे तर सर्वसामान्य विद्यार्थ्यालाही माहित आहे की मुहम्मद (स.) हे लहानपणी गुराख्याचे काम करीत होते. युवावस्थेत ते खदीजा यांच्या व्यापाराचे काम पाहत असत. त्या चाळीस वर्षीय विधवा महिला होत्या. प्रेषित मुहम्मदने त्यांच्याशी विवाह केला. ते विवाहाच्या वेळी पंचवीस वर्ष वयाचे होते. चाळीस वर्षाच्या वयात त्यांना जिब्रैल (अ.) या फरिश्त्या (देवदूता) मार्फत विदित झाले की ईश्वराने त्यांना प्रेषित्व प्रदान केले आहे. त्यानंतर कुरआनच्या श्लोकां(आयती) चे अवतरण सुरु झाले. त्या आयतींच्या संकलनाने कुरआन या पवित्र ग्रंथात रूपांतर झाले.

खरे सांगायचे म्हणजे त्यांचे जीवन सुरुवातीपासूनच परमभक्ता समान होते. त्यांना ऐहिक सुखाची जरासुद्धा आसक्ति नव्हती. त्या काळांत त्यांच्यासारखी एकपण व्यक्ति अस्तित्वात नव्हती. जिब्रैल (अ.) हे देवदूत त्यांच्याचकडे कां आले ही विचार करण्यासारखी बाब आहे. अल्लाहने त्यांना प्रेषित म्हणूनच पाठविले होते की त्यांच्या स्वभावातील विशेष गुणांमुळे त्यांना

प्रेषित्व प्राप्त झाले याबाबत वाद न घालता ईश्वराने त्यांना प्रेषित्व प्रदान केले हे सत्य स्वीकारायला हवे. त्यांनी ईश्वराची भक्तिभावाने प्रार्थना केली, त्याग व तपस्या केली व ते प्रेषित्वास पात्र झाले. 'हिरा' या डोंगराळ गुफेत जाऊन राहत. कधी कधी तर ते बरेच दिवस तेथेच मुक्काम करीत. ईश्वराच्या प्रार्थनेत लीन होऊन अन्नपाण्याविना समाधिस्त होत. त्यांचे हितचिंतक त्यांना घरी घेऊन येत. कुरआनात अल्लाहचे कथन आहे की, हे मुहम्मद (स.) अल्लाहला माहित आहे की आपण कधी एकटे तर कधी कधी आपल्या सोबत्यांसह रात्रीच्या वेळी नमाज पढण्याकरिता उभे राहता. कदाचित ही गोष्ट विरोधकांनी खोटी ठरविण्याकरिता हे कथन ईश्वरीय नसून स्वत: प्रेषित मुहम्मद यांनीच म्हटले आहे अशी आलोचना केली गेली असेल. येथे याबाबत वाद करण्याची गरज नाही हे मात्र सत्य आहे की ते रात्रभर नमाज पढत असत. हे जर सत्य नसते तर लोकांनी त्यावर सहज विश्वास कसा केला असता.

भोग विलासाचा त्यांना गंधही घेतला नव्हता. पक्षपात करणारे विचारहीन लोक निश्चितच चुकीचा निष्कर्ष काढतात. सत्य घटनावर गंभीरपणे विचार करण्याची गरज आहे. त्यांनी पंचवीस वर्षाच्या वयात चाळीस वर्ष वयाच्या विधवेशी विवाह करुन तिच्याशी तिच्या मृत्युपर्यंत पूर्णत: प्रामाणिक राहिले. त्या वेळी ते पन्नास वर्षाचे झाले होते. ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे की ही घटना त्या काळातली आहे ज्या काळात विवाह म्हणजे मौजमस्ती मानली जात होती. विवाहाबाबत आमची धारणा वेगळी आहे. त्या काळात एक पुरुष दहा-वीस लग्न करु शकत होता. म्हणून प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याबद्दल विषयासक्त असल्याचा विचार ही मनात निर्माण करणे पाप केल्यासारखे आहे. हिंदू धर्मानुसार जीवनांच्या ज्या भागास गृहस्थाश्रम मानले जाते तो भाग त्यांनी त्यांच्या वयापेक्षा १५ वर्ष अधिक वयाच्या महिले सोबत घालविले यावरुन सिद्ध होते की ते निश्चितच कामवासनाधीन नव्हते. खरे सांगायचे म्हणजे विवाहास एक कर्तव्य मानून त्यांनी वैवाहिक जीवन पार पाडले. आवड-निवडीचा त्यांनी प्रश्नच निर्माण केला नाही.

वयाची ५० वर्ष पूर्ण झाल्यानंतर प्रथम पत्नीच्या देहान्तानंतर त्यांनी दहा वर्षाच्या कालावधीत दहा विवाह केले. मात्र त्यांच्या वयाच्या पन्नास वर्षापर्यंतच्या पत्निव्रताने हे सिद्ध होत नाही का की त्य.नी इतके विवाह कोणत्या कारणास्तव केले असतील ? ज्या देशातील लोक.नी त्यांना अल्लाहचे प्रेषित मानले होते त्यांनी याबाबत आक्षेप घेतला नसत. का ? मग प्रेषित मुहम्मद (स.) यांचा इतके विवाह करण्यामागे काय उद्दे.श होता. तत्कालिन समाजातील लोक आपली मुलगी वा बहीण उच्च घराण्यातल्या व्यक्तीशी विवाहबद्ध करण्यास इच्छुक असत. भारतातही ही प्रथा प्रचलित होती. मिथिला येथे या प्रथेचा इतका जोर होता की कुलीन मैथिल ब्राम्हण वीस ते तीस विवाह करीत असत. पण बिचारे त्या पत्नींना घरी न आणता स्वत: त्यांच्या घरांत जाऊन राहत. एखाद्या पत्नीचा त्यांना कधी सहवासही प्राप्त होत नसे. सारांश, कोणत्याही बाबींचा विचार करताना तत्कालीन सामाजिक रुढीपरंपरा लक्षात घेणे आवश्यक असते. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या भार्यापैकी बहुतेक त्यांच्या सोबती व अनुयायींच्या मुली होत्या. आपले त्यांच्याशी संबंध घनिष्ट व्हावे या हेतूने त्यांना त्यांच्याशी विवाह करावे लागले. मुहम्मद (स.) तत्कालिन सर्व श्रेष्ठ कुरैश वंशाचे सदस्य होते. म्हणून त्या वंशाशी संबंध जोडण्यास लोकांना अभिमान वाटत असे. जैद नांवाच्या गुलामाच्या घटस्फोटित पत्नीशी विवाह करणे म्हणजे आश्चर्याची बाब होती. जैद त्यांचा गुलाम व नंतर दत्तकपुत्रा समान होता. या संदर्भात कुरआनाची एक आयत (श्लोक) अवतरित झाली. जैद यांनी पत्नीस तलाक दिला होता.

ह्या सर्व गोष्टी आपणांस विचित्र वाटतात. कारण आम्हाला तत्कालीन अरब समाजाबद्दल ज्ञान अवगत नाही व त्याबाबत पुरेशी कल्पनाही नाही. आपल्याच देशातील बऱ्याच प्रथांबद्दल इतर देशातील लोकांना आश्चर्य वाटते. तत्कालिन अरब आपल्या सावत्र आयांशी लग्न करीत असत. मुगलांच्या काळांतही अशा घटना निदर्शनास येतात. या गोष्टीचा विचार करता हे सिद्ध होते की त्यांनी लोकांपुढे आदर्श मांडण्याचा कटाक्षाने प्रयत्न केला. ईश्वरावर त्यांचा दृढ विश्वास होता व त्याच दृढविश्वासाने त्यांना विश्वविजय प्राप्त करुन





दिला. हजरत अबूबबकर सिद्दीक मक्केहून मदीनेकडे जाताना शत्रूंच्या भीतीने चिंतित होऊन प्रेषितांना म्हणाले "विरोधी अनेक आहेत व आपण दोघेच आहोत'. त्यांच्याशी कसा मुकाबला करु शकू ?" प्रेषित मुहम्मद (स.) लगेच म्हणाले, "अबू बक्र, आपण दोघे नाही. तिघे आहोत, तिसरा आपला अल्लाह आहे व तो विरोधकांपेक्षा फार शक्तिशाली आहे !" अशी होती त्यांची भरीव आस्था. याच आस्थेने त्यांना अनेक कठीण परिस्थितीत सुरक्षा प्राप्त झाली. हजरत अबूबक्र सह त्यांनी एका गुफेत आश्रय घेतला. विरोधकांच्या येण्यापूर्वीच कोळ्याने गुफेच्या तोंडावर जाळे विणले. विरोधक आले त्यांनी कोळ्याचे जाळे पाहिले व गुंफेत कोणी शिरलेले नाही असे गृहित धरुन दूर निघून गेले. ईश्वराने प्रेषिताचे रक्षण केले.

हे उघड आहे की विलासी माणूस अशी अलौकिक जबाबदारी स्वीकारुच शकत नाही. दूसरी महत्वाची बाब म्हणजे खाण्यापिण्याचाही संबंध मानवी मनाशी असतो. प्रत्येकास चांगले वस्त्र नेसावेसे वाटते, चांगले जेवावेसे वाटते, परंतु मुहम्मद (स.) च्या कपड्यांवर नेहमीच थिगळ लावलेले असत व ते अनेक वेळा कैक दिवसांपर्यंत उपाशी राहत असत. मक्केहून मदिनेकडे प्रयाण (हिजरत) केल्यानंतर इस्लामचा जोमाने प्रसार व प्रचार होऊ लागला. त्याकरिता त्यांना अनेक युद्धे लढावी लागली त्यांत बद्रच्या ऐतिहासिक युद्धाचाही समावेश आहे. ते स्वतः युद्धात सहभागी होत. या युद्धामुळे बऱ्याच लोकांनी हा भ्रम पसरविला की इस्लाम तलवारीच्या जोरावर पसरविला गेला. या ठिकाणी या विषयावर सविस्तर वर्णन वा खुलासा देता येणार नाही. या बाबत स्वतंत्र लेख लिहावा लागेल. केवळ एवढे सांगावेसे वाटते की हिंदू धर्मीयांनी याबाबतीत असे विचार मनात आणू नये. वेदांत ऋषिमुनींनी अनेकदा ईश्वराकडून अथवा देवीदेवतांकडून शक्ति प्रदान व्हावी म्हणून याचना केली आहे, ज्याद्वारे त्यांना शत्रूंचा सर्वनाश करता येईल. तत्कालिन आर्यांनी त्या मंत्राचा उपयोग केला नसेल का ? आजही हिंदू धर्माची भूमिका काय आहे ? जरतुश्त व मूसा (अ.) यांनीही विरोधकाविरुद्ध शस्त्र उगारले होते. हजरत ईसा (अ.) यांनी बलीवेदी वर आपले प्राण अर्पण केले मात्र त्यांच्यानंतर ख्रिस्ती

धर्मीयांनी रक्तपात केला नाही काय ? गौतम बुद्ध अहिंसावादी होते, मात्र भारताबाहेरील बौद्धधर्मीय देशानी कोणता मार्ग स्वीकारला ? चंगेज खाँ व कुबलयखाँ सुरवातीला बौद्ध होते. भारतातील प्रतापी सम्राट कनिष्क बौद्ध होता. सर्वांनीच रक्तपात केला आहे. महात्मा गांधीच्या बाबतीत सांगायचे झाल्यास त्यांनी अहिंसावादाचा प्रचारच नव्हे तर त्यावर प्रत्यक्ष यशस्वीरित्या अंमल ही केला. मात्र त्यांच्या वधानंतर आज भारतीय काय करीत आहेत. महाभारतात् कृष्ण केवळ राजकीय नेताच नव्हे तर उच्च कोटीचा तत्वज्ञानी होता. त्याने युद्धसंबंधातच गीतेचे व्याख्यान दिले होते. मला प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कार्य भगवद्‌गीतेच्या विरोधात असल्याचे दिसून येत नाही. इस्लामने अल्लाहच्या मार्गात जिहाद च्या मार्गाचा अवलंब करण्याची आज्ञा दिली आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ज्या युद्धात भाग घेतला ते राज्यस्थापने वा राज्यविस्तारासाठी नव्हते. त्यांनी इस्लाम च्या विरोधकांशी युद्ध केले होते. त्यांचा संघर्ष म्हणजे सत्याचा असत्याशी, न्यायाचा अन्यायाशी, धर्माचा अधर्माशी मुकाबला होता. प्रेषित मुहम्मद (स.) तर सदैव ईश-आराधनेत लीन असत. म्हणून त्यांच्या विरुद्ध वेगळे काही बोलणे अयोग्य ठरेल.

लक्षात घ्या, जर त्यांनी शस्त्र उगारले नसते तर धर्म प्रचार तर सोडाच त्यांना त्यांच्या स्वत:च्या प्राणाचे संरक्षण ही करता आले नसते. सर्व महापुरुषांना देश, काल इत्यादि सर्व बाबींचा विचार करावा लागतो. शीख धर्माचे जिवंत उदाहरण आपल्यासमोर आहे. पहिले पाच गुरु केवळ पूजा-अर्चा करीत राहिले मग त्यानंतरच्या गुरुंना धर्मरक्षणासाठी शस्त्र उगारणे अनिवार्य वाटू लागले. हेच तत्व इस्लामलाही लागू आहे. महापुरुषांची ओळख त्यांच्या कार्यपद्धतीपेक्षा त्यांच्या प्रवृत्ती व मनोकामनेने होते. या दृष्टिकोनातून विचार करता त्यांची कार्यपद्धत गौण स्थानी असते. त्यांच्या कार्यपद्धतीचा आधार घेऊन त्यांच्या महापुरुषत्वाला आव्हान देता येणार नाही. प्रेषित मुहम्मद (स.) एक परमभक्त झाले आहेत. ते केवळ धर्म प्रवर्तक होते हा संकीर्ण दृष्टिकोन बाजूस सारुन त्यांच्या संपूर्ण जीवनाचे नि:पक्षपातपणे अध्ययन केल्यास खरे चित्र दृष्टिगोचर होऊ शकेल.

# खरे शौर्य

**(सरदार पूर्णसिंह 'अध्यापक')**

बघा 'हिरा' या पर्वतीय गुफेत जगातील लोकांपासून दूर जाऊन एक अनाथ विचित्र निद्रावस्थेत झोपला आहे. जसे गल्लीत पडलेल्या दगडाकडे कोणीही लक्ष देत नाही तसेच एका सामान्य व्यक्ति समान या अनाथाला ही कोणी ओळखत नाही. एका अत्यंत उदार मनाच्या धनसंपन्न महिलेकडे तो नोकरी करतो. जगाच्या दृष्टिने त्याला गुलामाएवढीच सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त होती. पण काहीतरी दैवी कारण घडले व या अपरिचित व अनोळखी व्यक्तीत परिवर्तन घडून आले. त्याला जाग आली, संपूर्ण जगात जणू हजारो विजा कडाडल्या ! अरबस्थानच्या वाळवंटात जणू स्फोटकाने आग पसरविली. या शूराच्या डोळ्यातील तेजाने इंद्रप्रस्थापासून थेट स्पेनपर्यंत प्रकाश पसरला. त्या अज्ञात व गुप्त गुहेत झोपलेल्याने एक आरोळी दिली. संपूर्ण भूतल कंपित झाले. होय जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी "अल्लाहो अकबर" चे गीत गाण्यास प्रारंभ केला तेव्हा संपूर्ण जग शांत झाले व अल्पावधीतच त्या गीतांचा प्रतिध्वनि निसर्गाने सर्व दिशांना पसरविला. पक्षी 'अल्लाहू' गाऊ लागले व मुहम्मद (स.) यांचा संदेश घेऊन इथे तिथे उडू लागले. पर्वत त्यांची वाणी ऐकून वितळू लागले. नद्या अल्लाहू अल्लाहू चा जप करीत पर्वतावरुन खाली वाहू लागल्या. जे लोक त्यांच्यासमोर आले ते त्यांचे दास झाले. चंद्रसूर्याने एका पाठोपाठ प्रणाम केले. त्या शूर वीराचे चमत्कार पहा, शेकडो वर्षानंतरही जगातील बेसुमार लोक त्यांचे नामःस्मरण करतात व त्या अपरिचित, कधीही न पाहिलेल्या व्यक्तीच्या केवळ ऐकीव नावावर स्वतःचे अल्पकालीन जीवनास तुच्छ मानून तत्परतेने अर्पण करण्यास जीवनाचे यश मानतात.

# इस्लाम - एकता संदेश

(श्री कंवल भारती रामपूर-यू.पी.)

इस्लामचे अध्ययन केल्यास लक्षात येते की इस्लाम विश्वाचा सर्वश्रेष्ठ धर्म आहे. हा खऱ्या अर्थाने दीन (परिपूर्ण जीवन पध्दती) आहे. यात कोणतीच दूषित धारणा दृष्टिगोचर होत नाही. या धर्माचे वैशिष्ट्य असे आहे की यानुसार केलेले प्रत्येक कृत्य अल्लाहसाठी असते. जिहाद सुद्धा केवळ अल्लाहच्या मार्गात असते.

इस्लाम कोणत्याच एका विशिष्ट व्यक्तिच्या हितासाठी नसून त्याद्वारे संपूर्ण मानव समाजाचे कल्याण साधण्याचा प्रयत्न केला जातो. इस्लाम सर्व मानव समान नसतात असा पाठ देत नाही.

इस्लाम जितका पवित्र, सत्यवादी व नैतिकतेचा प्रतीक आहे, त्यास भारतीय समाज तेवढा सम्मान देत नाही. अद्याप भारतीय समाजाने इस्लामकडे हवे तेवढे लक्ष दिलेले नाही. सखेद म्हणावेसे वाटते की जो धर्म मानवांना एकतेच्या एका सूत्रात बांधू पाहत आहे व ज्यात कोणतीच बाब दूषित व निंदनीय नाही, त्याच धर्माबद्दल लोक द्वेष बाळगतात.

इस्लामचा पवित्र ग्रंथ कुरआनात म्हटलय,

**तुमच्याकडे अल्लाहकडून प्रकाश व स्पष्ट ग्रंथ आला आहे. त्या ग्रंथातील आदेशानुसार जो अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी कार्य करतो, तो त्याला शांती सुरक्षेचा मार्ग दाखवितो व आपल्या आदेशाने अशा लोकांना अंधारातून प्रकाशाकडे नेतो व त्यांना सरळ मार्ग दाखवितो.**

*(सूरे अल मायदा - १६)*

कुरआन केवळ मुसलमानांकरिता लाभदायी नसून संपूर्ण मानव समाजासाठी अनुकरणीय, प्रेरणादायक व कल्याणकारी आहे.

# इस्लामची शिकवण

**कोणत्याही व्यक्तीस धर्मांतरासाठी विवश करता कामा नये.**

*(कुरआन सूरह १० आयत ९९)*

कुरआनचे हे वैशिष्टय आहे ज्यामुळे ते सर्वश्रेष्ठ व पवित्र मानले गेले आहे.

## महिलांच्या बाबतीत अशिष्टतेचा अभाव

या संदर्भात इस्लाम खरोखरच प्रशंसनीय "दीन" (धर्म) आहे. महिलांचा नेहमीच अपमान होत आला आहे. पुरुषांनी त्यांना आपल्या स्वार्थासाठी खेळण्यासारखे वागविले आहे. अनेक धर्मामध्ये महिलांची निंदा करण्यात आली आहे. किन्तु इस्लामने महिलांविषयी औदार्य व सम्मानजनक व्यवहाराची शिकवण दिली आहे. त्यानुसार

**स्त्रियांना सामान्य नियमानुसार पुरुषांसारखेच अधिकार प्राप्त आहेत. मात्र पुरुषांना महिलांवर श्रेष्ठत्व प्राप्त आहे व अल्लाह प्रभुत्वशाली व तत्वदर्शक आहे.** *(कुरान सूरह २ आयत २१८)*

## आपापसातल्या एकतेचे प्रतीक

इस्लाम मानवांना संगठितपणे राहण्यासाठी एका सूत्रात बांधू इच्छितो. इस्लाम लोकांना विखुरलेल्या स्थितीत राहण्यापेक्षा संगठित राहण्याचा संदेश देतो.

सामुहिक नमाजने एकट्याने पढलेल्या नमाज पेक्षा २७ पट अधिक पुण्य प्राप्त होते. *(बुखारी व मुस्लिम)*

या उपदेशाने उपरोक्त संदेशाची पूर्णपणे पुष्टि होते.

## सदाचाराचे प्रतीक

इस्लामला सदाचाराचे प्रेरणास्त्रोत म्हटल्यास अनुचित होणार नाही. इस्लाम मानव्रास दुराचारापासून अलिप्त करुन जीवनमार्ग प्रशस्त करतो. इस्लाम क्षणोक्षणी सदाचाराचा उपदेश देतो. सदाचाराबाबत कुरआनातील कांही आयतींचा (श्लोकांचा) खाली उल्लेख केला आहे.

**केवळ पूर्व वा पश्चिमेकडे चेहरा करणे म्हणजे पुण्य करणे वा आज्ञाधारी असणे असे नाही. उलट आज्ञाधारी ते आहेत जे अल्लाहवर अंतिम दिनावर (आखिरतवर) देवदूतांवर (अल्लाहच्या पवित्र) ग्रंथावर, प्रेषितांवर श्रद्धा ठेवतात व (ज्यावर आपण मोहित आहोत अशा) आपल्या संपत्तीतून नातेवाईकांना, अनाथांना, दीन-दुबळ्यांना, प्रवाशांना व गुलामांना मुक्त करण्यासाठी दान करतात, नमाज पढतात, दानधर्म (जकात) देतात, दिलेल्या वचनाचे पालन करतात व दारिद्रय व आपत्तीत गुरफटले गेले असता संयम बाळगून सत्यमार्ग अवलंबतात. हेच लोक खरे (सदाचारी) सिद्ध झाले आहेत व हेच लोक (अल्लाहचे) भय बाळगणारे (संयमी) आहेत.**

*(सूरह २ : आयत १७७)*

## एकेश्वरवादाचे प्रतीक

इस्लाम धर्मात मूर्तिपूजा वर्ज्य आहे. इस्लाम केवळ निराकार अल्लाहला आराध्य मानतो. इस्लाम अनेकेश्वरवादाविरुद्ध आहे. अनेकेश्वरवादाचे मुळीच समर्थन करीत नाही. इस्लाम एकेश्वरवादास मान्यता देतो व एकेश्वरवाद अर्थात एकच अल्लाहच्या आराधनेची शिकवण देतो. हेच इस्लामचे महान वैशिष्ट्य आहे. याबाबत कुरआनात बऱ्याच आयती आहेत.

**त्यांना सांगा की तुम्ही अल्लाह शिवाय इतरांची पूजा करता जे तुमचे कांही नुकसान ही करु शकत नाहीत व कोणताच फायदा करु शकत नाही. केवळ अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्वज्ञ आहे.**

*(सूरह ५ : आयत ७६)*

**त्यांना पाय आहेत काय की ज्याच्या सहाय्याने ते चढू शकतील. त्यांना हात आहेत काय की ज्यांनी ते पकडू शकतील ? त्यांना डोळे आहेत काय की ज्यांनी ते पाहू शकतील? त्यांना कान आहेत काय की ज्याने ते ऐकू शकतील ? है पैगंबर (स.) त्यांना सांगा की बोलावून घ्या आपल्या मानलेल्या भागीदारांना (आराध्यांना) व तुम्ही सर्वजण मिळून माझ्याविरुध्द डावपेच रचा आणि मला मुळीच सवड देऊ नका.** *(सूरह ७-आयत १९५)*

या व्यतिरिक्तही इतर वैशिष्टये आहेत, ज्यांनी इस्लाम हा पवित्र धर्म आहे हे सिद्ध होते. खरे सांगायचे म्हणजे इस्लामसारखा धर्म शोधून ही मिळणार नाही. इस्लाममध्ये नैतिकता, सत्य, शालीनता व सामाजिकता या सर्वांचा भरगच्च समावेश आहे. पवित्र दीन (इस्लाम खऱ्या अर्थाने समाजवादाचा प्रतीक आहे व त्याचे अनुसरण केल्यास मानवाच्या मनात सत्य, सौजन्य, अहिंसा, देशप्रेम व नैतिकतेचा संचार होतो.

या, आज आपण सर्वजण मिळून इस्लामच्या पावित्र्याचा परिचय करुन घेऊ व त्याआधारे जीवनात तारतम्य निर्माण करण्याचा प्रयत्न करु.

# इस्लामचे श्रेष्ठत्व

**(स्वामी विवेकानंद)**

प्रत्येक प्रेषिताने जगाला कोणत्या ना कोणत्या सत्याचा संदेश दिला आहे. जेव्हा आम्ही सत्याच्या संदेशाबाबत मनन चिंतन करतो व त्याचबरोबर प्रचारक महापुरुषाच्या जीवनाचे अवलोकन करतो तेव्हा त्या सत्याच्या प्रकाशात संपूर्ण जीवन स्पष्ट दिसू लागते. महापुरुषांचे शब्द त्यांच्या जीवनाची परिभाषा असते. त्यांच्या प्रकाशात त्यांच्या जीवनाच्या एक एक घटनेचे महत्व प्रगट होऊ लागते.

तुम्ही विचाराल की त्यांच्या धर्मात काय वैशिष्ट्य आहे. उघड आहे की जर त्यात चांगल्या गोष्टी नसत्या तर ते आजपर्यंत अस्तित्वातच राहिले नसते. चांगल्या गोष्टी कल्याणकारी बाबीच जगात अस्तित्वात राहू शकतात. बाकी सर्व विनाशाच्या अंधकारात विलीन होऊन जातात. जो कल्याण करणारा आहे तोच सर्वांच्या स्मरणात दृढपणे अस्तित्वात राहतो, म्हणूनच त्यास अनन्तकालीन जीवनाधिकार प्राप्त होते. या जीवनात अपवित्र व दुराचारी माणसांचे जीवनकाल अत्यल्प असते. संताचे जीवन निश्चितच दीर्घकालीन असते. कारण संतस्वभाव ही शक्ति आहे व पावित्र्य हे बल आहे. जर इस्लाममध्ये विशेष चांगली तत्वे नसती, काही शुभ नसते तर ते आजतागायत हयात राहिले नसते. इस्लाममध्ये यथेष्ट चांगली तत्वे आहेत. मुहम्मद (स.) समता चे संदेशवाहक आहेत. ते मानव समाजात, मुसलमानात बंधुभावाचे प्रचारक होते.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या प्रत्यक्ष आचरणाने दाखवून दिले होते की मुसलमानामध्ये समता व बंधुभाव राहणे आवश्यक आहे. तुर्कस्तानचा सुलतान आफ्रिकेच्या बाजारातून हब्शी गुलाम खरेदी करुन त्याला साखळीत जखडून आपल्या देशात आणू शकतो. पण ह्याच गुलामाने जर इस्लाम स्वीकारला व भूषणावह गुण अंगिकारले तर तो तुर्कस्थानच्या राजकुमारीशी विवाह-पात्र ठरु शकतो. मुसलमानाच्या या उदारतेचे या देशातील (अमेरिकेतील) निग्रो व रेड इंडियन लोकांशी केल्या जाणाऱ्या अमानुष तुलना तर करुन बघा. हिंदू सुद्धा काय करतात. जर अमेरिकेतील एखाद्या धर्मोपदेशकाने चुकून एखाद्या सनातनी हिंदूंच्या भोजनास स्पर्श केल्यास तो त्वरीत ते अशुद्ध झाले असे मानून फेकून

देईल. आपले तत्वज्ञान उच्च व उदार असले तरी आपले व्यवहार, आचारविचार, आमल्या दुर्बलतेचे प्रचारक आहेत. मात्र इतर धर्मांच्या तुलनेत मुसलमानांना आम्ही या बाबतीत अत्यंत प्रगतिशील मानतो. जातिभेद, वर्णभेद, वगैरे बाबींचा विचार न करता सर्वांमध्ये बंधुभावाची भावना निर्माण करणे हाच इस्लामचा सर्वात महत्वाचा आदर्श आहे. ज्याप्रमाणे राजकारणात सत्य-असत्याची चिंता न करता मनुष्य एका राजकीय पक्षाचा सदस्य होतो, अशाच लोकांनी एका विशिष्ट धर्माच्या लोकांना आपलेसे करुन घेतले आहे. मात्र हा धर्म नाही. जगांत असे ही काही मूर्ख व अंध व्यक्ति आहेत जे त्यांच्या जवळच शुद्ध गोड पाण्याची विहीर असताना ही खारट विहीरीचे पाणीच पिण्यास योग्य मानतील कारण त्या विहिरीचे निर्माण त्यांच्या पूर्वजांनी केले होते. म्हणून मी माझ्या अल्प अनुभवाने जे शिकलो आहे ते असे आहे की जे दोष व कमीपणा लोक धर्मात शोधत असतात त्यास खरे पाहता धर्म जबाबदार नसतो. धर्माने कधीच लोकांवर अत्याचार, करण्याची शिकवण दिलेली नाही, धर्माने कधीच स्त्रियांना चेटकीन वा भूत-पिशाच्च म्हणून जिवंत जाळून टाकण्याचा आदेश दिलेला नाही. कोणत्याच धर्माने अशा प्रकारे अन्यायकारक कृत्य करण्याची शिकवण दिलेली नाही. मग लोकांना अशा प्रकारे अत्याचार व दुराचार करण्याची प्रेरणा कोणी दिली ? कूटनीति वा धर्माने मुळीच दिलेले नाही. अशा प्रकारच्या कुटिल राजकारणाने धर्माचे स्थान ग्रहण करुन धर्माचे नांव धारण केले असेल तर यात दोष कुणाचा ?...... धर्माचा अर्थ आहे हृदयाच्या अंतस्थलात सत्याची निर्मिती करणे. जर तुम्ही आपल्या परम पित्याच्या घरात प्रवेश केला असेल तर त्यांच्या मुलांचे तुम्ही अवश्य दर्शन घेतले असेल; मग तुम्ही असे का म्हणता की तुम्ही त्यांना ओळखत नाही ? जर खरोखर तुम्ही त्यांना ओळखत नसाल तर तुम्ही निश्चितच ईश्वराच्या घरात स्थान मिळवू शकला नसाल. माता आपल्या मुलाला कोणत्याही वेषात ओळखून घेते. पुत्राने परिधान केलेला फसवा पोशाख तिला फसवू शकत नाही. सर्वच युगातील सर्वच महान नर-नारींना ओळखा व हे जाणून घ्या की त्याच्यात आपसात कोणातच भेद, अंतर वा वेगळेपणा नाही.

"महापुरुषों की जीवन गाथाएं" तून साभार उद्धृत (प्रस्तुतकर्ता :: श्री राष्ट्रबंधु)

# गांधीजी व इस्लाम

(अब्दुल बिस्मिल्लाह 'विरहो')

गांधीजींना इस्लाम फार प्रिय होता. ते इस्लामच्या सर्वच तत्वांना व शिकवणीला सत्य व प्रेरणादायक मानत असत. इतकेच काय, ते इस्लाम धर्माची उघडपणे प्रशंसाही करीत असत. इस्लामनुसार ईश्वरास निराकार मात्र सर्वशक्तिमान मानले जाते. ईश्वर व्यक्तिविशेष नाही. तो तर एक अशी परोक्ष सत्ता आहे जिचा प्रभाव व वर्चस्व संपूर्ण सृष्टिवर व्याप्त आहे. या संदर्भात गांधीजी स्वतः म्हणतात.

**ईश्वर कोणी व्यक्ति नाही तो सर्वत्र अस्तित्वात आहे व सर्वशक्तिमान (कादिरे मुतलक) आहे. जो कोणी त्याला आपल्या हृदयात सामाऊन घेतो त्यात अशा सशक्त आशा व आकांक्षा सामावल्या जातात की त्यांची तुलना बाष्प व विजेच्या शक्तीशी करता येणार नाही.** *(प्रार्थना का महत्व, प्र.४५)*

## अवतारवाद

जर कोणी म्हटले की लंडनमध्ये वारा वायूयान (विमान) झाला आहे तर आपण त्याला मूर्ख वा वेडा समजू कारण वारा कधी वायूयान (विमान) बनू शकत नाही. याचप्रकारे निराकार ईश्वर कधी मनुष्याचे रुप धारण करु शकत नाही.' जरी आम्ही ईश्वरास सर्वशक्तिमान समजतो, मात्र याचा अर्थ असा नाही की ईश्वर ईश्वरत्व सोडून मनुष्यत्व प्राप्त करील.

बघा, गांधीजी या विषयी काय म्हणतात.

**ईश्वर मनुष्य नाही, म्हणून तो एखाद्या मनुष्यात उतरतो वा अवतरित होतो असे म्हणणे सत्य होऊ शकत नाही.**

*(प्रार्थना का महत्व प्र. ६७)*

या वरुन स्पष्ट होते की गांधीजी अवतारवादाच्या प्रचलित धारणेच्या विरोधात होते. निश्चितच त्यांची विचारधारा इस्लामच्या विचारधारेशी मेळ खाते.

## सामुहिक प्रार्थना

इस्लाम धर्मात नमाजचे महत्व तर आहेच मात्र सामुहिक नमाजचे विशेष महत्व आहे. नमाज व्यक्तिगतरित्या ही अदा केली जाते परंतु फर्ज नमाज ''जमाअत''सह (सामुहिकपणे) अदा झाली पाहिजे. ''जमाअतकी नमाज'' म्हणजेच सामुहिक प्रार्थना होय.

मनुष्य समाजात राहतो. म्हणून त्याची काही सामाजिक कर्तव्ये असतात. अशाच कर्तव्याचे पालन करताना समाजातील लोकांनी एकत्र येऊन सामुहिक प्रार्थना करणे निश्चितच सौहार्दपूर्ण होईल. सामुहिक प्रार्थनेचे महत्व गांधीजींच्या शब्दात असे आहे.

**व्यक्तिगत प्रार्थना ठीक आहे मात्र सामुहिक प्रार्थना करतांना कोणीही लज्जित होण्याचे कारण नाही. मनुष्य जर एकत्र हसू शकतो, बोलू शकतो, गप्पांचा आनंद घेऊ शकतो मग एकत्र प्रार्थना का करु शकत नाही ?** *(प्रार्थना का महत्व पृष्ठ ८)*

यावरुन स्पष्ट होते की गांधीजी इस्लामच्या ''जमाअत च्या नमाजीला अर्थात् सामूहिक प्रार्थनेस विशेष महत्व देत असत.

सामुहिक प्रार्थनेच्या महत्वाबाबत वेदांत ही उल्लेख केला गेला आहे ऋग्वेदाचा श्लोक असा आहे.

**सखाय आ निषिदत सवितास्तो भ्यो नु नः दाता**
**राधासि शुम्मंति।** ऋग्वेद

अर्थात ''मित्रांनो, या, सर्वजन एकत्र बसा. सर्वांना निर्माण करणाऱ्या ईश्वराची आम्ही निश्चयपूर्वक सामुहिक प्रार्थना करायला हवी. सर्वसाफल्य देणारा ईश्वर आम्हास पवित्र करील.''

## अल्लाहू अकबर

गांधीजींना 'अल्लाहू अकबर' फार प्रिय वाटत असे. ते अल्लाहू अकबरला एक घोषणा मानीत असत. अशी घोषणा जिच्यामुळे सर्व ईश्वरप्रेमी लोकांच्या हृदयात खळबळ निर्माण होते. एकदा काही लोकांनी त्यांच्याशी 'अल्लाहू अकबर' बाबतच्या निष्ठेविरुद्ध नापसंती व्यक्त केली. गांधीजींनी उघडपणे उत्तर दिले.

**माझ्या मतानुसार जगाने या पेक्षा महान घोषणेस जन्म दिलेला नाही. या धार्मिक घोषणेत आत्मा उंचावला जातो. या घोषणेचा अर्थ आहे की केवळ ईश्वर महान आहे. हा उच्च भावना प्रबळ करणारा अर्थ आहे. घोषणा अरबी भाषेत आहे म्हणून तिचा निषेध करायचा कां ? जर दोन धर्मात कायम स्वरुपी शक्ति निर्माण करायची असेल तर, हिंदूनी आपल्या मुस्लिम मित्रांबरोबर ही घोषणा देण्यास संकोच बाळगता कामा नये.** *प्रार्थना का महत्व पृ.८०*

**कुरआनचे अध्ययन :**

गांधीजीनी कुरआनचे अध्ययन केले होते. एकदा एका व्यक्तिने त्यांना कुरआनच्या एका आयतीचा अर्थ समजून सांगण्यास विनंती केली. ते कुरआनविषयी जे काही बोलतात त्यावरुन लक्षात येते की त्यांना कुरआनाचे ज्ञान प्राप्त होते, ते पहा-

**कुरआन तर प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या जीवन काळात अवतरित झाले होते. ज्या भागाचे प्रार्थनेत (नमाज पढताना) पठण केले जाते ते अत्यंत दुर्लभ मानले जाते. ते एक प्रकारचे मंत्र आहे. आम्हाला त्याचा अर्थ समजो न समजो, जोवर त्याचे शुद्ध मनाने व शुद्ध उच्चारात पठण केले जाते, ते ऐकताना कर्णमधुर वाटते. त्याचा अर्थ असा आहे की आम्ही सैतानापासून सुरक्षित राहण्यासाठी अल्लाहकडे आश्रय घेतो. अल्लाह दयाळू (रहीम) आहे. तो महान आहे. तो आम्हाला सैतानापासून सुरक्षित ठेवू शकतो. तो कोणाचा मुलगा नाही व त्याचा कोणताच मुलगा नाही.'' शेवटी ते प्रार्थना करतात की आम्हाला अल्लाहच्या आदेशानुसार चालणाऱ्या लोकांच्या मार्गावर ने. बहकलेल्या व पथभ्रष्ट झालेल्या लोकांच्या मार्गावर नेऊ नकोस.** *प्रार्थना का महत्व पृ. ५५५*

गांधीजींच्या उपरोक्त कथनात एका ठिकाणी म्हटले आहे की अल्लाह महान आहे : त्यांना अल्लाहू अकबर निश्चितच फार प्रिय वाटत होते त्यांना प्रिय कां वाटू नये ? धन्य आहे तो गुलाम जो आपल्या मालकास सतत सर्वश्रेष्ठ मानत असतो व ज्या मालकास तो सर्वश्रेष्ठ मानत आहे तो संपूर्ण सृष्टिचा मालक आहे. सजीव व निर्जीव सर्वांचाच तो मालक आहे.

# टागोरांचे उद्गार

**(रविंद्रनाथ टागोर)**

महाकवि एकदा इस्लामचे इतिहासकार, विद्वान व तत्वदर्शी मौलाना सय्यद सुलेमान नदवी यांच्यासह रेल्वेत प्रवास करीत होते.

या दोन्ही विद्वानांना एकत्र प्रवास करताना एका व्यक्तीने प्रश्न विचारला की ज्या वेगाने इस्लाम (सत्य धर्म) प्रेषित मुहम्मद (स.) व खिलाफते राशिदाच्या काळात प्रसार करीत होता, त्याच वेगाने आज कां पसरत नाही ?

सय्यदसाहेबांनी या प्रश्नाचे उत्तर गुरुदेव यांनी द्यावे अशी प्रार्थना केली. तेव्हा गुरुदेव यांनी त्या व्यक्तीस उत्तर दिले.

**त्या काळात धर्माबाबत भलेवाईट जाणून घेण्यासाठी लोकांना वाचनालयाकडे धाव घेण्याची गरज नव्हती. त्या बाबतचे पुरेसे ज्ञान प्रत्येक मुसलमानाच्या जीवनात साक्षात अस्तित्वात होते.**

भारतीय मुसलमान गुरुदेवांच्या या विचाराचे आकलन करतील काय ?

# इस्लामी संस्कृति

'संस्कृति' या शब्दाचा अर्थ आहे परिष्करण, उत्तम बनविणे, याचा अर्थ आहे मानवी बुद्धिचा विकास, मानवी ज्ञानाची उन्नति यात चांगल्या अभिरुचि व चांगल्या रुढीपरंपरांचा ही समावेश होतो. याचा संबंध व्यक्तिगत व सामाजिक जीवनाशी ही आहे. जीवनाच्या भौतिक व अध्यात्मिक बाबींचा ही यात समावेश आहे. ही आहे इस्लामिक संस्कृतीची धारणा. आमचे भोजन कोणत्या प्रकारचे असते, आम्ही कोणत्या प्रकारचे वस्त्र परिधान करतो, आम्ही कशा प्रकारच्या घरात राहतो, किंवा आमचे व्यवहाराचे इतर कोणते साधन आहेत यावर इस्लामिक संस्कृतिची धारणा अवलंबून नसून आमचे आचरण कसे आहे, आमची मानसिक अवस्था कशी आहे, आमचे आत्मिक व अध्यात्मिक विचार कसे आहेत, आमची सामाजिक दशा कशी आहे, आमची नैतिक पातळी कशी आहे या गोष्टींवर अवलंबून असते. केवळ कला व साहित्याचा यात समावेश नसून न्याय व क्षमाशीलता मन व बुद्धिचा उत्कर्ष व इतर अभिव्यक्तींचा यात समावेश आहे. इस्लाम कला व सर्व वैज्ञानिक प्रवृत्तींना तसेच उद्योगांना उत्तेजना प्रदान करतो. परंतु ही उत्तेजना मानवी दृष्टीकोना अंतर्गत असते. इस्लाम कलेला केवळ कलेसाठी प्रोत्साहन देत नाही व वैज्ञानिक अविष्काराबाबतचे प्रोत्साहन केवळ आनंद प्राप्त करण्यासाठी नसते. मानवी प्रयत्नांची दिशा मानव कल्याणा (Human Welfare) कडे असावी असा इस्लामचा मूळ उद्देश्य आहे.

मुस्लिम, सज्जनांप्रमाणे नेहमी उत्तम गोष्टींच्या शोधात असतात. दुसऱ्यांकडून चांगल्या गोष्टींचा स्वीकार करण्यात त्यांना संकोच वा कमीपणा वाटत नाही. इस्लामी संस्कृतिने विकास काळात अनेक गोष्टीचा स्वीकार केला. ही तिची एक वेगळीच प्रतिमा अस्तित्वात आहे. इस्लामी संस्कृति ग्रीस या रोमन संस्कृतिच्या प्रभावाधीन ही नाही की ती इराणी संस्कृतिने दडपली गेली सुध्दा नाही. आमच्या काही आलोचकांचा इस्लामी संस्कृतिबाबतचा या विपरित केलेला आरोप फोल मानायला हवा. इस्लामी संस्कृति मूळ स्वरुपात अस्तित्वात आहे व निव्वळ इस्लामी तत्वाने सज्ज आहे. इस्लाम हे एका प्रकारे लोक-आंदोलन आहे. या संस्कृतीत अनेक संस्कृतींचे रुप व आकार एकवटले गेले आहेत. इस्लामी संस्कृतिचा आधार

कुरआन आहे. त्याला मानव निर्मित देश-विदेशाचे भेदभाव अमान्य आहेत. चामडीचा वर्ण, भाषेची विविधता, सामाजिक प्रथा लोकांमध्ये विभाजन करु शकत नाही. समस्त मानव समाज आदमची संतती आहे. म्हणून जगातले सारे लोक एकाच परिवाराचे सदस्य आहेत. मानवी बंधु-भाव इस्लामी संस्कृतिची सर्वोत्तम बाब आहे आणि त्यामुळे मानव समाज विकासाकडे अग्रेसर होतो. संपूर्ण मानव समाज एक समाज आहे ही भावना इस्लाम इतकीच प्राचीन आहे. ही विल्कि (Wilkie) ची कल्पना नव्हे. आमची ''एक लोक'' (एक समाजा) ची कल्पना आता सर्वत्र विकसित होत आहे. या धारणेला योग्य दिशेने अग्रेसर करणे हे आमचे कर्तव्य आहे.

इस्लामी संस्कृति विशेष प्रकारच्या भोजनावर निर्धारित करता येत नाही. भोजनाच्या बाबतीत मनुष्य एका वैध सीमेपर्यंत स्वतंत्र असतो. हाच नियम पोशाखाबाबत ही लागू आहे. इस्लामी संस्कृति कोणत्याही एका प्रकारच्या पोशाखात बंदिस्त झालेली नाही. इस्लामला नग्नता मान्य नाही. नग्नता टाळून कोणत्याही प्रकारची वेशभूषा स्वीकारण्याची इस्लाममध्ये सूट आहे. जे उत्तम आहे ते इस्लामला मान्य आहे, मात्र असे करताना इस्लामने निषिद्ध केलेल्या बंधनाबाबत उल्लंघन होता कामा नये. इस्लामी संस्कृति विकासोन्मुख असण्याचे हे मूलमंत्र आहे.

इस्लामी संस्कृति शांति व क्षमा या तत्वांना पोषक व समर्थक आहे. ही अशी मनोव्यवस्था व मानसिक स्थितिची द्योतक आहे जिच्यामुळे मुस्लिम शांति दूत सिद्ध होतात. याच कारणास्तव उदार व विनयशील भावनेने मुसलमानानी दुसऱ्यांचे उत्तम विचार व तत्वाचा नि:संकोच स्वीकार केला, मग ते विचार कोणत्याही जाती जमातीचे असोत.

जेंव्हा आम्ही (भारतीय) आपल्या सांस्कृतिक परंपरेबाबत चर्चा करतो तेव्हा आम्हाला असे विचारायचे असते की मुसलमानांनी वेगवेगळ्या भागात ज्ञान, विज्ञान व साहित्य आदि क्षेत्रांत सामुहिकरित्या कोणती प्रगती केली आहे ?

तर्क व बौद्धिक क्षमतेच्या आधारावर आरंभिक काळातील मुस्लिम विद्वानाने जे तुलनात्मक व विश्लेषनात्मक अध्ययन केले आहे व

कितीतरी शतकांपर्यंत सामुहिक प्रगति दर्शविली आहे ती आमची प्राचीन सांस्कृतिक संपत्ती आहे. इस्लामच्या गतिशील शिकवण व संस्कृतिच्या कारणाने एक गतिशील संस्कृतिचा उगम होऊन तिचा प्रभाव निर्माण झाला व ती निरंतर प्रगत होत आहे.

प्राचीन संस्कृतीत, सामाजिक समानता व बंधुत्वाचे आदर्श निर्माण कार्यकुशलता व विचार स्वातंत्र्याचा बौद्धिक आदर्श, सदाचरणाचा नैतिक आदर्श व सत्यप्रियतेवर अवलंबित मानवतेचा मापदंड तसेच राज्याचे राजनैतिक आदर्श जे जनपरामर्शाच्या तत्वांवर व जनस्वातंत्र्याच्या इच्छांवर आधारित आहे, दिसून येतात.

इस्लामी संस्कृति मानवाच्या भौतिक व अभौतिक कृत्यांमध्ये एकरुपता निर्माण करते. हे तर आंतरविरोधी असलेल्या वस्तूंचे कौतुकास्पद मिलन आहे. न्यूनता व अधिकता, व्यक्ति व समाजामधील संतुलन व त्यात लोक-परलोकाची असामान्य एकरुपता दिसून येते.

सारांश असे की इस्लामची आपली एक स्वाभाविक व परिपूर्ण संस्कृति आहे जी इस्लामी हिऱ्याच्या पैलूत विभिन्न छटांमध्ये प्रतिबिंबित होते व जिने मानवी जीवनास संपूर्ण आच्छादित करुन घेतले आहे. त्यामुळे अनेकतेत एकतेची अद्‌भूत भावना जन्म घेते. थोडक्यात सांगायचे म्हणजे मुस्लिम संस्कृतीत आम्हाला जे विभिन्न रुप दिसून येत आहेत त्यात नायकत्वाच्या भावनेचा आभास होतो.

इस्लाममध्ये धर्म व लौकिक तत्वात विभाजन दिसून येत नाही. इस्लाम संपूर्ण जीवनाशी एकरुपतेचा व्यवहार करतो. व्यवहाराच्या या पद्धतिमुळे सुरवातीला भौतिक शास्त्र व इतर तत्वज्ञानाचे अध्ययन मशीदीत कुरआन, हदीस व फिक्हा सह शिकवले जात होते. अशा प्रकारच्या शिक्षण पद्धतीस कायम करणे व त्याच्या बाबतीत लोकांत आवड निर्माण करणे इस्लामी संस्कृतिची प्रमुख विशेषता आहे. आता आम्ही रुढीवादी झालोत. आम्ही इस्लामसंबंधी काही पारंपारिक कथा व धारणा निर्माण केल्या आहेत व त्यांचे अंधानुकरण करीत आहोत. आम्ही जीवनाच्या विविध क्षेत्रात इस्लामचा प्रकाश मुहम्मद (स.) यांचे शुद्ध, बौद्धिक व तर्कसंगत सुबोध शिकवणी जाणून घेण्यास आतुर आहोत.

इस्लामी संस्कृति विश्वसनीय व आकर्षक असून हृदयात भावना जागरुक करणारी आहे. मात्र हे विसरता कामा नये की आपल्या तत्वांबरोबर दृढता ही अपेक्षित आहे. संस्कृतीच्या तत्वात तितकीच दृढता राहील जितकी ती मूळ तत्वाच्या व गुणाच्या सानिध्यात राहील. इस्लामिक संस्कृति इस्लामी तत्वांशी निगडित राहते हा तिचा स्वाभाविक व विशेष गुणधर्म आहे. जोपर्यंत इस्लामिक तत्वांची सुरक्षा होत राहील तोवर इस्लामी संस्कृति सुस्पष्ट व आकर्षक राहील.

सांस्कृतिक विकासाचे एक कालचक्र आहे. ग्रीस व रोमण एके काळी उन्नतिच्या शिखरावर होते. त्यानंतर मुसलमानांना चार शकतापर्यंत प्रभुत्व प्राप्त राहिले नंतर पाश्चात्य देशांनी वर्चस्व प्राप्त केले.

पाश्चात्य देशांची आधुनिक संस्कृतिचे प्रभुत्व दिर्घकाळ टिकेल असे वाटत नाही. गतकालीन काही शतकाच्या गुलामगिरी व बौद्धिक निष्क्रियतेनंतर आता आम्ही सर्व पौर्वात्य देशांत नवजीवनाची प्रेरणा प्राप्त करीत आहोत. आम्ही मुसलमानाची भूमिका बजावून पुन्हा एकदा तेच ऐतिहासिक कर्तव्य पार पाडीत आहोत ज्याचा ईश्वराने आदेश दिला आहे. हे आम्ही इस्लामिक संस्कृतिच्या मूळ तत्वांशी कुठवर जुळवून घेतो त्यावर अवलंबून आहे. उपरोक्त तत्वांना जर आम्ही समजून घेऊन त्यावर दृढतापूर्ण अवलंब करीत राहिलो तर मानवास, ज्या गुलामीत तो पकडला जात आहे त्यातून, मुक्त करण्याची क्षमता प्राप्त करु शकू.

ऐतिहासिक क्रांतीस कोणीच थांबवू शकत नाही. केवळ प्रतीक्षा करीत राहण्यात व डोळे विस्फारुन पाहत राहण्याने काही प्राप्त होणार नाही. ऐतिहासिक क्रांतिसाठी आम्हाला त्याच प्रकारचे प्रयत्न करायला हवे जे आमच्या पूर्वजांनी केले होते. हे कार्य व्यवस्थितपणे पार पाडले गेले पाहिजे जेणेकरुन शक्तिशाली प्रभावातून अपेक्षित यश प्राप्त होऊ शकेल. आम्ही जे कार्य करु ते करताना इस्लामच्या मूल तत्वांची उपेक्षा होता कामा नये. कारण तेच आमच्या संस्कृतिचे आधारस्तंभ आहेत.

# नमाज-प्राचीन प्रार्थना पद्धत

**(श्री.एस.एस.शरीफ कुरैशी)**

सत्कर्माचा मार्ग स्वीकारुन ईश्वराची प्रसन्नता व अनंतकालीन सुखशांति प्राप्त करावे हेच मनुष्याच्या जीवनाचे ध्येय आहे व याचेच नाव इस्लाम आहे. त्यास अल्लाहने पसंत केले आहे. याच दीन (धर्म) कडे आदम (अ.) पासून प्रेषित मुहम्मद (स.) पर्यंतच्या सर्व प्रेषितांनी आमंत्रित केले आहे. या धर्माचा मूळ आधार तौहीद (एकेश्वरवाद) आहे, अर्थात ईश्वर एक आहे हे मान्य करुन सैतानी व आसूरी शक्तींचा बहिष्कार करणे असा आहे.

**आम्ही प्रत्येक जनसमूहात एक पैगम्बर पाठविला, आणि त्याच्याद्वारे सर्वांना खबरदार करुन टाकले की "अल्लाहची भक्ति करा आणि अनिर्बंध बनलेल्या (तागूत) च्या उपासनेपासून अलिप्त रहा.** *(कुरआन १६:३६)*

हजरत ईसा (अ.) यांनी म्हटले आहे.

**हे अल्लाह, लोकांनी तुला एकमेव सत्य मानावे हेच अनन्त जीवन आहे.** *(यूहन्ना १७:३)*

दुसऱ्या ठिकाणी म्हटलंय :

**येशू ख्रिस्ताने उत्तर दिले की मी दिलेली शिकवण माझी नसून मला पाठविणाऱ्याची आहे.** *(यूहन्ना ७:१६)*

मात्र सैतान सुरुवातीपासूनच दीन (धर्म) अनुसार जीवन जगणाऱ्यांचा शत्रू राहिला आहे. तो आदमच्या संततिला बहकविण्याचा प्रयत्न करीत राहतो. कधी नक्षत्रांची पूजा करा म्हणतो तर कधी मूर्तिपूजेकडे वळवितो तर कधी त्रिश्वरवादाकडे लोकांना आकर्षित करतो. अशा तऱ्हेने तो लोकांना सत्यधर्मापासून विचलित करण्याचा प्रयत्न करीत राहतो व लोकांना पाप करण्यास भाग पाडतो; ज्यामुळे मनुष्य अनंतकालीन शिक्षेस पात्र होतो. मनुष्याला पापमुक्त जीवन व्यतीत करायचे असेल तर त्यांनी

सत्यमार्गाचा अवलंब करायला हवा व गतकालीन पापाकरिता क्षमायाचना करायला हवी. कुरआनात म्हटलंय

**जे लोक वाईट कृत्य करतील व मग पश्चाताप व्यक्त करतील व श्रद्धा ठेवतील तर निश्चितच या पश्चाताप व श्रद्धेनंतर तुझा पालनकर्ता क्षमा करणारा व दया दर्शविणारा आहे.** *(कुरआन ७:१५३)*

बायबलमध्ये म्हटलंय

**जर आम्ही आपल्या पापांची कबूली दिली तर तो आमचे पाप माफ करतो व संपूर्ण पथभ्रष्टता नष्ट करणारा तो एकमात्र सत्य (ईश्वर) आहे.** *(प्रथम पत्र यूहन्ना १/६)*

**मग क्षमा मागा व त्याच्याशी रुजू व्हा, जेणेकरुन तुमचे पाप नष्ट होतील.** *(अमाल;२२:३)*

**क्षमा याचना करा व पापकृत्यांपासून दूर व्हा, जेणेकरुन तुमचे व्यभिचार (अनेकेश्वरवाद) तुमच्या विनाशाचे कारण होणार नाही.** *(हीजकीईल ३०:१२)*

**क्षमा याचना करा कारण आकाशाचे साम्राज्य जवळ आले आहे.** *(मता ४:१७)*

या आयती (श्लोका) ने स्पष्ट होते की अल्लाह सर्वांचा सृजनकर्ता व पालनकर्ता (रब) आहे, कृपाशील व दयावंत आहे. त्याने जर क्षमादान केले तर त्याची त्याच्या दासा (लोक) वर कृपा मानावी. म्हणून कुरानात ही शुभ वार्ता दिली आहे.

**हे प्रेषिता (माझ्या वतीने सांगा) की माझ्या दासांनी आपल्यावर कष्ट ओढवून घेतले त्यांनी अल्लाहच्या दयेपासून निराश होऊ नये, अल्लाह तर सर्व गुन्हे माफ करणारा आहे तो अत्यंत क्षमाशील व दयावान आहे.** *(कुरआन : ३९-५३)*

कुरआनची ही आयत स्पष्टपणे सांगत आहे की नैराश्य पाप आहे व अल्लाहची अवज्ञा आहे. अल्लाहच्या क्षमाशक्तिचे क्षेत्र अत्यंत व्यापक आहे जे

लोक ओझ्याखाली दबले गेले आहेत (दु:खी व कष्टी आहेत) त्यांनी निराश होऊन ईश्वरावरील श्रद्धेविरुद्ध जाऊ नये. उलट अल्लाहकडे वळावे व त्याच्याकडे आपल्या दुष्कृत्यांबद्दल क्षमा याचना करावी

वेदात म्हटले आहे -

**आईम यदि दिवा यदि नत्क मेना: सि**

**चक्रमाव्यम । वायुमा तसदेन विश्वान्मुचत्व हस.** *(२०:१५)*

अर्थात - जर दिवसात व रात्री आम्ही पाप केले, त्या सर्व व इतर दुर्वतनापासून परमेश्वर आम्हास मुक्त करो.

गुरु ग्रंथ साहब मध्ये ही पापांचे प्राय:श्चित केल्यानंतर ईश्वराशी क्षमादानाची प्रार्थना केली आहे.

समुद्रात व सागरात ज्याप्रमाणे अमर्याद जल भरलेला आहे त्याचा कोणीही अंदाज करु शकत नाही. हे ईश्वरा माझी पापकृत्येही त्याचप्रमाणे अंदाजाच्या पलिकडे आहेत (हे ईश्वरा !) तू तर बुडणाऱ्या दगडास ही तारू शकतो, आमच्यावर ही कृपा कर व आमच्या सर्व दुष्कर्माबद्दल आम्हास क्षमा कर.''

मोक्षप्राप्तीसाठी ईश्वराच्या सेवेत उपस्थित होणे अर्थात नतमस्तक होऊन ईश-गुणगाण (हम्द व सना) करने ही आवश्यक आहे बायबलमध्ये म्हटले आहे.

**तुझ्यासमोर माझ्या व्यतिरिक्त दूसरा कोणताच आराध्य नसावा. तू स्वत:साठी धरती, आकाश व जलाशयात असणाऱ्या कोणत्याच वस्तूची मूर्ति तयार करु नकोस. त्यांच्यासमोर नतमस्तक होऊ नकोस. त्यांची पूजा (इबादत) करु नकोस. कारण मी तुझा ईश्वर आहे व स्वाभिमानी ईश्वर आहे.** *(खुरुज २०:२-५)*

गीतेत उपासनेचे तीन प्रकार दाखविले गेले आहेत.

**यज्ञदान तप: कर्म न त्याज्य कार्यमेव तत।**

**यज्ञो दान तपाश्चैव पावनानि मनीषणाम।** *(१८/५)*

"यज्ञ, दान, तप अवश्य करायला हवे, ते कधी टाळता कामा नये. त्या कर्मांनी मानव शुद्ध होतो."

ग्रंथसाहेबात म्हटले आहे :

"हे ईश्वरा ! तूच माझा दाता आहेस, मला तुझे केवळ एकच दान हवे आहे; ते म्हणजे असे की तू मला उपासना (इबादत) करण्याची बुद्धि दे"

इस्लामी उपासनेत नमाजला प्राधान्य देण्यात आले आहे. नमाजबाबत सर्वच ठिकाणी आदेश करण्यात आले आहेत.

"नमाज मला स्मरण करण्यासाठी अदा करा" -

नमाज खरोखर पवित्र व उच्च प्रतिची कृति आहे ज्यामुळे आमचा अल्लाहशी संबंध प्रस्थापित होतो, आम्ही त्याच्या दयेस पात्र होतो व आमची श्रद्धा दृढ होते. प्रतिदिन पांच वेळा अल्लाहसमोर करबद्ध होऊन उभे राहणे, वाकणे, नतमस्तक होणे व दुआ (प्रार्थना) करणे अशी कृत्ये आहेत ज्यामुळे खरोखर आमचे गुनाह माफ होतात. अल्लाहचा निर्णय आहे की :

"निश्चितपणे, ईमानवाले (श्रद्धावंत) सफल होतील जे नमाजात विनम्र होतात."

मनोवैज्ञाकिदृष्ट्या ही बाब सिद्ध होते की "नमाज अश्लील व दुष्कर्मापासून अलिप्त करते."

हिंदूच्या योगदर्शनाच्या पुस्तकात म्हटले आहे :

**योगश्चिवृत्ति निरोधः** *(योगदर्शन १/२)*

अर्थ - योगात हृदयातील वृत्तींना रोखणे, मनात उठणारे (कु) विचारांना विरोध करणे.

**तदा द्रष्टा ! स्वरूपऽवस्थानम्** *(योगदर्शन १/३)*

"दुराचारापासून प्रावृत्त झाल्याने द्रष्टा (पाहणारा) प्रतिष्ठित स्वरुप धारण करतो."

नमाज जीवनांत परिवर्तन निर्माण करते, चरित्र उंचावते व सत्यवादी

होण्यास व प्राय:श्चित (तौबा) करण्यास प्रेरित करणारे उत्तम व न्यायसंगत साधन आहे. नमाज अल्लाहच्या दासांना (लोकांना) त्याच्या जीवनाचे उद्देशाची जाणीव करुन देते व त्यांच्या कर्तव्यांची त्यांना जाणीव करुन देते. वर म्हटल्याप्रमाणे सर्वत्र नमाज पढण्याबाबत ताकीद करण्यात आली आहे. नमाज पढण्याच्या पद्धतीची व नमाजच्या ज्या विधी आहेत त्याबाबत बायबलने पुष्टि होते....

**अजान :** दिवस-रात्रच्या अवधीत ५ वेळा प्रत्येक नमाज अगोदर मशीदीच्या मीनार (मनोऱ्या)वरुन मुस्लिमांना सुरेल आवाजात नमाजसाठी हांक दिली जाते. या आवाजाने संपूर्ण वातावरणात कंपन निर्माण होते. अजानमध्ये उच्चारलेल्या शब्दांचा अर्थ असा आहे.

अल्लाह सर्वात महान आहे : अल्लाह सर्वात महान आहे.

मी साक्ष देतो की अल्लाहशिवाय कोणीही आराध्य नाही.

मी साक्ष देतो की मुहम्मद (स.) अल्लाहचे प्रेषित आहेत.

नमाजसाठी या .... साफल्याकडे या

अल्लाहशिवाय उपासनेस कोणीच पात्र नाही. प्रात:कालच्या नमाजच्या अजान मध्ये हे शब्द वाढविले जातात. ''नमाज झोपेपेक्षा चांगली आहे.''

नमाजबाबत कुरआनात म्हटले आहे.

**निर्विवादपणे, मुसलमानावर नमाज फर्ज (अनिवार्य) आहे व ती वेळेच्या बंधनानुसार !** *(कुरआन ४:१०३)*

दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे :

**हे मुसलमानांनो ज्यावेळी नमाजासाठी बोलाविले जाते. तुम्ही अल्लाहचे स्मरण करण्यासाठी त्वरेने निघा.** *(कुरआन:९-६२)*

**बायबलमध्ये अजानऐवजी वेगळी पद्धत दिली आहे. ''अल्लाहने मूसा (अ.) यांना सांगितले की चांदीची नरसिंगे**

**(तुतारी) बनवून घे.... त्यांचा उपयोग जमातीला बोलाविण्यासाठी करावा व जेव्हा दोन्ही नरशिंगे फुंकली जातील तेव्हा साऱ्या जमातीने सभागृहा (Assembly Hall) च्या द्वाराजवळ माझ्या सानिध्यात एकत्र व्हावे.** *(गिन्नती १०:१-३)*

पवित्रस्थानी पादात्राणे काढून ठेवण्याबाबत कुरआनात खालीलप्रमाणे आदेश आलेत.

**जेव्हा ते तेथे पोहचले तेव्हा हांक दिली गेली 'हे मूसा (अ) मीच तुझा पालनकर्ता आहे. पादात्राणे काढून ठेव. तू 'तुवा' या पवित्र खोऱ्यात आहेस.** *(कुरआन २०/११-१२)*

बायबलमध्ये असं म्हटलंय

''मग त्याने त्याला म्हटले 'इकडे जवळ येऊ नकोस.'

**आपल्या पायातून जोडे काढून ठेव. कारण ज्या ठिकाणी तू उभा आहेस ती पवित्र भूमी आहे.** *(खुरुज ५:३ आमाल ६:३३)*

नमाजमध्ये स्वच्छता व शुद्धतेकडे विशेष लक्ष दिले जाते जेणेकरुन शरिराचा बाह्य भाग अस्वच्छ राहू नये व आत्मा नि शरीर दोन्ही सतेज रहावेत. म्हणून कुरआनात म्हटले आहे.

**हे श्रद्धावंतांनो, जेव्हा तुम्ही नमाजसाठी उठाल तेव्हा हे आवश्यक आहे की तुम्ही आपले तोंड व हात कोपऱ्यापर्यंत धुवावे, डोक्यावर हात फिरवावे व पाय घोट्यापर्यंत धूत जावे.** *(कुरआन ६:५)*

बायबलमध्ये म्हटले आहे

**मूसा हारून व त्याच्या मुलांनी त्यात हात पाय धुतले ते जेव्हा सभागृहात (Assembly Hall) प्रवेश करीत... स्वतःला धुऊन (शुद्ध करुन) जात असत... ज्याप्रमाणे अल्लाहने मूसा यांना आज्ञा दिली होती...** *(खुरुज ४०:३१-३२)*

कुरआनात नमाज पढताना काबाकडे तोंड करावे असे म्हटले आहे.

याचा अर्थ असा होत नाही की त्यात अल्लाह निवास करतो. उद्देश एवढाच की काबा मुसलमानांचा केंद्र आहे,त्यात म्हटलंय,

**प्रत्येकासाठी (प्रत्येक धर्मीयांसाठी) एक दिशा निश्चित असते ज्याकडे (उपासना करताना) तो तोंड वळवितो.** - *(कुरआन २:१४८)*

बायबलमध्ये म्हटलं आहे.

**दनियल.... आपल्या घरी आले. त्यांच्या खोलीची खिडकी येरुशलमकडे उघडी होती. ते दिवसातून तीन वेळा नियमानुसार गुडघे टेकून अल्लाहच्या सेवेत प्रार्थना करीत व आपले कृतज्ञता दर्शवीत असत.** *(दानीएल ६:१०)*

**मुसलमानाचा पहिला किबला (प्रार्थनेची दिशा) बैतुल मुकद्दस (येरुशलम) होता. परंतु अल्लाहला नंतर काबाला किबला करावयाचे होते म्हणून आज्ञा मिळाली "आता आपले चेहरे (नमाजच्या वेळी) काबाकडे करत चला."** *(कुरआन)*

कुरआनात या आदेशाचा उद्देश असा आहे की नमाजमध्ये एका प्रकारे शिस्त व एकरुपता निर्माण व्हावी.

इस्लाममध्ये केवळ एकमेव अल्लाहची उपासना (इबादत) केली जाते. केवळ अल्लाहला क्षमा करण्याचा अधिकार प्राप्त आहे. मानवास सरळ शब्दात सांगण्यात आले आहे की, "लोक हो ! तुम्ही मला हांक द्या, मी तुम्हास प्रतिसाद देईन." मनुष्य त्याची प्रार्थना करुन त्याला हाक देऊ शकतो, त्याच्यासमोर वाकू शकतो, त्याच्याशी संबंध निर्माण करु शकतो व कोणत्याही मध्यस्थाशिवाय आपल्या पापांचे पश्चाताप व्यक्त करुन क्षमायाचना करु शकतो व श्रद्धावान बनून राहण्याची प्रतिज्ञा करु शकतो. मार्गदर्शन प्राप्त करुन मोक्ष मिळविणाऱ्यांकरिता कुरआनात शुभ संदेश आहे.

**अल्लाह कडे पुन्हा पुन्हा वळणारे, त्याची भक्ति करणारे, त्याचा महिमागान करणारे (त्याच्यासाठी पृथ्वीवर भ्रमण करणारे), रोजे करणारे, त्याच्यासमोर झुकणारे व नतमस्तक होणारे, सत्कर्मांचा**

हुकूम देणारे व दुष्कर्मापासून रोखणारे आणि अल्लाहच्या मर्यादांचे रक्षण करणारे (हेच लोक श्रद्धावंत आहेत) हे प्रेषिता ! या श्रद्धावंतांना (जन्नतची) शुभवार्ता द्या. *(कुरआन ९:११२)*

नमाज पढताना प्रथम करबद्ध होऊन अल्लाहसमोर निवेदन केले जाते

"हे अल्लाह ! तू पवित्र आहेस व सर्व प्रशंसेच्या योग्य आहे. तुझे नांव अत्यंत शुभ (लाभदायक) आहे. तू सर्वात महान आहे (तुझा महिमा अमर्याद आहे). तुझ्याशिवाय कोणीही उपासने (इबादतच्या) लायक नाही."

"मी सैतानापासून संरक्षण घेण्यासाठी अल्लाहचा आश्रय घेतो."

"अल्लाहच्या नांवाने जो अत्यंत कृपावंत व दयावंत आहे."

या नंतर सूरह फातेहा (कुरआनातील पहला सूरह) चे पठण केले जाते. सूरह फातेहा नमाजच्या प्रत्येक रकातमध्ये पठण करणे अनिवार्य आहे.

**स्तवन फक्त अल्लाहसाठीच आहे, जो सर्व सृष्टीचा पालनकर्ता आहे. एकमात्र कृपावंत आणि दयावंत व निर्णयाच्या दिवसाचा स्वामी आहे. आम्ही तुझीच भक्ति करतो आणि तुझ्यापाशीच मदत मागतो आम्हाला सरळ मार्ग दाखव. त्या लोकांचा मार्ग ज्यांना तू अनुग्रहित केलेस. जे कोपग्रस्त झाले नाहीत व जे मार्गभ्रष्ट नाहीत. आमीन !**

यानंतर कुरआनाची दूसरी सूरह किंवा कुरआनच्या भागाचे पठण केले जाते. नंतर रुकू केला जातो (कमरेपर्यंत वाकले जाते) अर्थात अल्लाहसमोर वाकले जाते व हळूहळू पुन्हा पुन्हा जप केला जातो.

"माझा अल्लाह मोठा शानवाला (महिमावंत) आहे"

अल्लाहसमोर गुडघ्यापर्यंत वाकण्याबाबत बायबलमध्ये म्हटले आहे.

**तो दनियल दिवसात तीन वेळा नियमितपणे गुडघे टेकून अल्लाहसमोर प्रार्थना करतो व त्याच्यासमोर आपली कृतज्ञता प्रगट करतो.** *(दानियल ६:१०)*

एका ठिकाणी असे म्हटले आहे

**मग इब्राहीम नतमस्तक झालेत व अल्लाहशी संवाद केला.**

*(पैदाइश ३:१७)*

रुकूनंतर सजदा (नत्मस्तक) केला जातो. प्रत्येक रकातमध्ये दोन वेळा नत्मस्तक व्हावे लागते व अल्लाहचे महिमागान करताना म्हटले जाते....

"माझा पालनकर्ता उच्च आहे व महिमावंत आहे."

प्रेषित ईसा (अ.) ने सुद्धा अल्लाहला सिजदा केला होता. इंजिलमध्ये उल्लेख आहे

"मग जरा पुढे जाऊन मस्तक जमीनीवर टेकले व प्रार्थना केली."

बायबलमध्ये येशू ख्रिस्ताबद्दल म्हटले आहे.

"मग येशू ख्रिस्ताने जमिनीवर नतमस्तक होऊन सिजदा केला."

प्रेषित एलियाच्या बाबतीत म्हटले आहे :-

"एलया करमलच्या शिखरावर चढला व जमिनीवर नतमस्तक होऊन आपले मुख आपल्या गुडघ्याच्या मध्ये ठेवले."

हजरत मूसा (अ.) च्या बाबतीत असे म्हटले आहे की

**आणि मूसा (अ.) व हारून (अ.) यांनी जमात जवळच्या सभागृहाच्या (असेम्बली हॉलच्या) द्वारावर डोके टेकले.** *(गिनती २०:६)*

नंतर सिजद्यातून उठून जमिनीवर गुडघे दुमडून अदबीने पठण केले जाते.

"सर्व प्रकारच्या मौखिक, शारीरिक आणि आर्थिक उपासना परमेश्वरासाठीच आहेत. हे प्रेषित ! तुम्हावर सुखशांति व्हावी. ईश्वराची कृपा व अनुकंपा (बरकत) व्हावी. तसेच सुखशांति आम्हावर आणि ईश्वराच्या साऱ्या सदाचारी श्रद्धावंतावर व्हावी. मी साक्ष देतो की ईश्वराशिवाय कोणीही पूजनीय नाही, तसेच साक्षी आहे की हजरत मुहम्मद (शांति असो त्यांवर) हे त्या परमेश्वराचे दास व प्रेषित आहेत."

''हे ईश्वरा, कृपा वर्षाव असावा (तुझ्या प्रेषित) मुहम्मद (स.) वर आणि त्यांच्या संतति व अनुयायींवर ज्या प्रकारे तुझा कृपा-वर्षाव हजरत ईब्राहीमवर तसेच इब्राहीम या प्रेषिताच्या संततीवर आणि अनुयायींवर झाला आहे. खरोखर तू सर्वथा पशंसनीय आणि महान आहेस.''

''हे माझ्या परमेश्वरा ! मुहम्मद (स.) व त्यांची संतति आणि त्यांच्या अनुयायींवर अनुकंपा कर, ज्याप्रमाणे हजरत इब्राहीम, त्यांच्या संतति आणि त्यांच्या अनुयायांवर अनुकंपा (बरकत) केलीस. खरोखर तू सर्वथः प्रशंसनीय आणि महान आहेस.''

उपरोक्त ''दरुद-ए-इब्राहीम'' चे पठण केल्यानंतर दुआ (प्रार्थना) पठण केली जाते.

''हे अल्लाह ! मी स्वतःवर बरेच जुलूम केलेत, व तुझ्याशिवाय माझे गुनाह (पाप) कोणीही माफ करु शकत नाही. तू मला क्षमा कर व आपल्या विशेष कृपेने माझ्यावर दया कर. निःसंदेह तू कृपावंत व दयावंत आहेस.''

शेवटी उजव्या व डाव्या बाजूस तोंड फिरवून ईश्वराच्या सर्व दासाकरिता (लोकांकरिता) सुखशांति व सुरक्षितेची दुआ (प्रार्थना) करतात. ती दुआ अशी

''तुम्हांवर सुख शांति (सलामती) आणि ईशकृपा (रहमत) चा वर्षाव होवो.''

अशा प्रकारे नमाज पूर्ण केली जाते. मग हात पसरुन ईश्वराकडे दुआ (प्रार्थना-याचना) करुन ऐहिक व पारलौकिक यशाची मागणी केली जाते.

''हे पालनकर्त्या, तू आम्हास जगात ही यश दे व परलोकात (आखिरतमध्ये) ही भले कर व आम्हास नरकाग्नी (जहन्नुम) च्या यातनांपासून मुक्त कर.''

इंजिलमधील एक महत्वपूर्ण दुआ (Lords Prayer) पण अशाच प्रकारची आहे.

**हे आमच्या पिता, तू जो आकाशात आहेस, तुझे नांव पवित्र**

**मानले जावो. तुझे साम्राज्य होओ, तुझी इच्छा ज्याप्रमाणे आकाशात पूर्ण होते तशाच जमिनीवर होवो. आमचे आजचे भोजन दे व ज्या प्रकारे आम्ही आमच्या कर्जदारांना माफ केले आहे तू पण आमचे कर्ज माफ कर व आमची परीक्षा घेऊ नकोस. त्यापेक्षा आम्हाला दुष्कर्मापासून अलिप्त ठेव. आमीन** *(सत्ता ६ ९-१४)*

हात वर करुन दुआ मागण्याच्या पद्धतिबाबत बायबलमध्ये म्हटलंय की

**जेव्हा (प्रेषित) सुलैमान अल्लाहची प्रार्थना समाप्त केली तेव्हा अल्लाहच्या मजबह ज्या ठिकाणी ते आपले हात आकाशाकडे पसरुन गुडघे टेकून बसले होते, उठून उभे राहिले.** *(१ सलातीन ८:५४)*

कुरआन व बायबलचे तुलनात्मक अध्ययन केल्यानंतर हे लक्षात येते की दोहोंमध्ये एकेश्वरवादाची शिकवण देण्यात आली आहे व एकमेव ईश्वराचे आज्ञापालन अनिवार्य ठरविण्यात आले आहे. हाच इस्लामचा संदेश आहे. म्हणून सृष्टिच्या कोणत्याही प्राण्यास आराध्य मानून त्याच्याकडून मोक्षाची आशा करणे म्हणजे पथभ्रष्ट झाल्यागत होईल.

इस्लामी आराधना पद्धतीने हार्दिक शांति प्राप्त होते, ईश्वराच्या महानतेचा अनुभव होतो व मानवी एकता निर्माण होते. इस्लामने इबादत (आराधने) ची जी पद्धत शिकवली आहे त्याने ऋषिमुनींच्या कठीण तपस्येचा व कौटुंबिक जबाबदाऱ्यांचा त्याग करणाऱ्या ख्रिस्ती वैराग्याच्या कठीण साधनेचा निषेध होतो. इस्लामच्या इबादतचा उद्देश्य आहे की तुमचा ईश्वराशी घनिष्ठ संबंध निर्माण व्हावा व आपण ईश्वरीय नियमानुसार जीवन व्यतीत करावे. मोक्ष प्राप्त करण्याचा हाच एकमेव मार्ग आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी संपूर्ण जगाला याच मार्गाकडे आकर्षित केले आहे व स्वतः त्या मार्गाचा अवलंब करुन आदर्श निर्माण केला आहे.

# इस्लामिक सदाचार

**(श्री कँवल भारती)**

सदाचाराचा अर्थ आहे सद् + आचार = अर्थात चांगले वर्तन वा चांगली वागणूक (एखादी व्यक्ती जर चांगले बोलत असेल, चांगल्या प्रकारे वागत असेल, सत्य व अहिंसेसारखे गुण त्याच्या स्वभावात असतील तर त्याच्या एकूण वागणुकीस सदाचार म्हणता येईल.

सदाचार असे तत्व आहे की ज्यामुळे मनुष्याचे जीवन निर्विघ्नच नव्हे तर सुखमय व श्रेयस्कर करुन टाकते. याकरिता मनुष्याला प्रत्येक क्षणी सदाचाराचा आश्रय घ्यावा लागतो. त्याच्या अभावाने मनुष्य गुदमरला जातो. त्याच्यात वाईट सवयी निर्माण होऊ लागतात. त्याचा जगावरील विश्वास कमी होत जातो. तो सुखशांति पासून वंचित होतो

हे सत्य आहे की सदाचाराचा मार्ग अत्यंत संकीर्ण असतो. त्यावर चालणे म्हणजे तप्त निखाऱ्यांवर चालण्यासारखे आहे. दुराचाराचा मार्ग प्रशस्त असतो. त्यावर चालणे सुखमय फुलांवर चालण्यासारखे सुखमय असते. मात्र हे निर्विवाद खरे आहे की सदाचाराचा मार्ग सुरवातीला जितका अरुंद व त्रासदायक वाटतो शेवटी तो प्रशस्त व सुखकारक सिद्ध होतो. याच्या विपरित दुराचाराचा मार्ग सुरवातीला जितका सुखकारक व प्रशस्त वाटतो शेवटी तितकाच तो कष्टमय रुप धारण करतो. जर मनुष्याला आपले जीवन सुखी व यशस्वी करायचे असेल तर त्याने सदाचाराचाच मार्ग स्वीकारला पाहिजे. हे कठीण वाटत असले तरी अशक्य नाही.

काही लोकांचे मत असे आहे की इस्लाममध्ये सदाचाराचे पाठ देण्यात आलेले नाही. याचमुळे मुसलमान आज दुराचारी होत चालला आहे. मला उलट असे म्हणायचे आहे की इस्लाममध्ये सदाचाराबाबत जितके शिक्षण देण्यात आले आहे तितके इतर कोणत्याच धर्मात देण्यात आलेले नाही. म्हणून इस्लाममध्ये सदाचाराचा अभाव आहे असे मानने निव्वळ भ्रामक भावना आहे. आता प्रश्न असा निर्माण होतो की जर इस्लाममध्ये

सदाचार मुबलक प्रमाणात आहे तर मुसलमान दुराचारी का होत आहेत? या समस्येस इस्लाम जबाबदार नाही. सूक्ष्मपणे निरीक्षण केल्यास असे आढळून येईल की मुसलमानच नव्हे तर हिंदू व शीखही दुराचारी होत चालले आहेत. याचा अर्थ असा तर होत नाही की हिंदू, खिस्ती व शीख धर्मात सदाचार अस्तित्वात नाही. वास्तविकतः दोष धर्मात नसतो, दोष आहे प्रचलित सामाजिक परिस्थितीचा.

आता आपण कुरआनच्या आधारे सदाचाराबाबत चर्चा करु या. सदाचाराबाबत चर्चा करण्यापूर्वी मला एक गोष्ट स्पष्टपणे सांगायची म्हणजे इस्लाम केवळ मुसलमानांकरिता नसून त्याची व्यापकता फार विशाल व विस्तृत आहे. जे लोक असे समजतात की इस्लाम केवळ एक विशिष्ट सामाजिक गटाकरिताच आहे, ते चुकीचा समज बाळगतात. इस्लाम हा अरबी शब्द असून त्याचे अनेक अर्थ निघतात. एक अर्थ आहे आज्ञापालन, आत्मसमर्पण, त्याग आदि. या अर्थाचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास लक्षात येईल की विश्वातील प्रत्येक वस्तू इस्लामिक आहे. असे म्हणण्याचे कारण असे की अशी कोणतीच वस्तू नाही जी सृजनकर्त्या ईश्वराच्या आज्ञेनुसार वागत नाही, ईश्वराच्या इच्छेनुसार आत्मसमर्पण वा त्याग करीत नाही. इस्लामचा दूसरा अर्थ सामोपचार-शांति तथा कुशल-मंगल असाही होतो. या अर्थाबाबत ही सखोल विचार करता इस्लाम एका विशिष्ट सामाजिक समूहा करिताच आहे असे म्हणता येणार नाही. विश्वाची प्रत्येक वस्तु खऱ्या अर्थाने इस्लामच्या परिधीत येते कारण ती तिच्या निर्मात्याच्या आदेशाच्या संपूर्णतः अधीनराहून सतत कार्यरत राहते. अबू सलीम मुहम्मद अब्दुल हई साहब त्यांचे पुस्तक "दीन की बातें" यांत पृष्ठ ८ वर लिहितात की मनुष्य सुद्धा याच धरतीवर राहतो. त्यालाही ईश्वराने जन्म दिला आहे. मनुष्याच्या जन्म, जीवित राहणे व मृत्यु पावणे बाबत ही काही नियम निर्धारित करण्यात आले आहेत. त्या नियमानुसार जो जन्म घेतो, श्वास घेतो, खातो पितो व इतर हालचाली करतो, त्याची सर्व कृत्ये इतर वस्तू प्रमाणे ईश्वराच्या आज्ञेअधीन आहेत. अल्लाहने डोळे पाहण्यासाठी दिलेत, माणूस डोळ्याऐवजी कानाने

पाहू शकत नाही वा नाकाद्वारे विचार करु शकत नाही, श्वास घेतल्याशिवाय तो जिवंत राहू शकत नाही. अशा प्रकारे मनुष्याच्या जीवनाचा फार मोठा भाग अल्लाहच्या आज्ञेत जकडलेला आहे. अशा प्रकारे तो जगातील इतर वस्तू समान तो ही 'मुस्लिम' (अर्थात आज्ञाधारी) आहे.

वाचकांच्या लक्षात आले असेल की इस्लाम केवळ एका विशिष्ट प्राण्यांसाठी नसून संपूर्ण प्राणीमात्रांसाठी आहे. आता आपण इस्लामी सदाचाराबाबत बोलू या. इस्लामचे अध्ययन केल्यास लक्षात येईल की इस्लाम श्रद्धा, नमाज, जकात (दानधर्म), आराधना (इबादत) व रुढीपरंपरा बाबत शिक्षण देतो. त्याच माणसाने शुद्ध सदाचारी व्हावे, चांगल्या संवयी अंगीकाराव्यात, असत्य, छळकपट, घमेंड व अहंभावासारख्या दुर्गुणांपासून अलिप्त रहावे अशी ही शिकवण देतो. इस्लाममध्ये एकाही वाईट गोष्टीचा समावेश करण्यांत आलेला नाही. ज्याने मनुष्य वाममार्गी होईल. इस्लाम मानवामध्ये दुर्व्यवहार व्हावा व त्यांनी एकमेकांशी उदारतेचा व्यवहार करु नये अशी शिकवण मुळीच देत नाही. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्पष्टपणे म्हटले आहे की, "तुमच्यात सर्वश्रेष्ठ तोच आहे ज्याचे आचरण शुद्ध आहे."

**आणि तुम्ही आपसामध्ये दुसऱ्याची संपत्ती अवैधपणे गिळंकृत करु नका किंवा आपल्या अधिकाऱ्यांच्या पुढे ते ह्या हेतूने स्पष्ट करु नका की तुम्हाला त्या संपत्तीमधील काही भाग हेतुपुरस्पर हकनाकपणे खाण्याची संधी मिळेल.** *(कुरआन २:१८८)*

**हे श्रद्धावंतानो, आपसात एकमेकांशी संपत्ती खोटया पद्धतीने खाऊ नका. व्यवहार झाला पाहिजे परस्परांच्या राजीखुशीने आणि आपल्या लोकांची हत्या करु नका. खात्री बाळगा की अल्लाह तुम्हावर मेहेरबान आहे.** *(कुरआन ४:२९)*

**हे श्रद्धावंतांनो, ही मदिरा व जुगार आणि वेदी व शकून ही सर्व अमंगल सैतानी कामे होत. यांच्यापासून दूर राहा, आशाआहे की तुम्हाला यश मिळेल.** *(कुरआन ५:९०)*

स्पष्ट आहे की मूर्तिपूजा करता कामा नये.

सांगा की "या मी तुम्हाला ऐकवितो की तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यावर कोणते निर्बंध घातले आहेत. ते असे की त्याच्यासमेवत कुणाला ही भागीदार बनवू नव. आणि आई-वडिलांशी सद्वर्तन करा, आपल्या संततीला दारिद्रयाच्या भीतीने ठार मारु नका. आम्ही तुम्हाला देखील उपजीविका देतो आणि त्यांनाहीदेतो व अश्लील गोष्टींच्या जवळपास देखील फिरकू नका मग त्या उघड असोत अथवा गुपित, आणि कोणत्याही जीवाला ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले आहे, ठार करु नका. परंतु न्यायसंगत असेल तर. या गोष्टी आहेत ज्यांचा आदेश त्याने तुम्हाला दिला आहे, कदाचित तुम्ही बुद्धिचा उपयोग कराल. *(कुरआन ६:१५१)*

जे लोक शीलवान, अजाण श्रद्धावंत स्त्रियांवर आळ घेतात त्यांचा इहलोक व परलोकांत धिक्कार केला जातो आणि त्यांच्यासाठी परलोकांत मोठा प्रकोप आहे. *(कुरआन २४:२३)*

स्पष्ट आहे की इस्लामने महिलांना सम्मान दिला आहे.

हे लोक हो, ज्यांनी श्रद्धा स्वीकारली आहे, आपल्या घराशिवाय व दुसऱ्यांच्या घरात प्रवेश करीत जाऊ नका, जोपर्यंत त्या घरातील लोकांची सम्मति मिळत नाही आणि त्या घरातील लोकांना तुम्ही सलाम करीत नाही. ही पद्धत तुमच्यासाठी उत्तम आहे. अपेक्षा आहे की तुम्ही हे लक्षात ठेवाल. *(कुरआन २४:२५)*

आणि लोकांशी तोंड फिरवून बोलू नकोस, पृथ्वीवर ऐटीत चालू देखील नकोस, अल्लाह कोणत्याही अहंकारी व गर्व करणाऱ्या व्यक्तीला पसंत करीत नाही. *(कुरआन ३१:१८)*

हे श्रद्धावंतानो, एका माणसाने दुसऱ्या माणसाची टिंगल उडवू नये, संभवतः ते त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ असतील आणि स्त्रियांनी सुद्धा दुसऱ्या स्त्रीची टिंगल उडवू नये. संभवतः ती तिच्यापेक्षा चांगली असू

शकेल. आपापसांत एकमेकांना टोमणे मारु नका आणि एकमेकांचा उल्लेख वाईट नांवाने ही करु नका. श्रद्धा ठेवल्यानंतर दुराचारांत नांव मिळविणे फार वाईट गोष्ट आहे. जे लोक या वर्तनापासून परावृत्त होत नसतील ते अत्याचारी होत. *(कुरआन ४९:११)*

हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अधिक शंका घेण्यापासून दूर राहा कारण काही बाबतीत कुतर्क करणे हे पाप आहे. हेरगिरी करु नका. आणि तुमच्यापैकी कुणीही कुणाची चहाडी करु नये. काय तुमच्यापैकी एखादा असा आहे की जो आपल्या मृत भावाचे मांस खाणे पसंत करील ? पहा, तुम्हा स्वतःला याची घृणा वाटेल, अल्लाहच्या कोपचे भय बाळगा, अल्लाह पश्चाताप स्वीकारणारा आणि परम कृपाळू आहे. *(कुरआन ४९:१२)*

अनाथावर सक्ति करु नका, आणि याचकाला झिडकारु नका. *(कुरआन सूरह ९३:९ व १०)*

आता पाहू या की कुरआन मनुष्यात कोणते गुण निर्माण करु इच्छितो.

तुमचा कर्जदार जर हलाखीच्या परिस्थितीत असेल तर सुबत्ता येईपर्यंत त्याला सवलत द्या. आणि जर दान करुन टाकाल तर ते तुमच्यासाठी जास्त चांगले आहे, जर तुम्ही समजून घ्याल. *(कुरआन २:२८०)*

जे कोणत्याही स्थितीत आपली संपत्ती खर्च करतात, मग ते बिकट स्थितीत असोत अथवा चांगल्या स्थितीत. जे राग गिळून टाकतात व दुसऱ्याचे अपराध माफ करतात. असे लोक सदाचारी लोक अल्लाहला अतिशय प्रिय आहेत. *(कुरआन ३:१३४)*

आणि जेव्हा एखादी व्यक्ति अदबीने तुम्हाला सलाम करील तर त्याला त्यापेक्षाही अधिक चांगल्या प्रकारे उत्तर द्या किंवा त्याचप्रमाणे उत्तर द्या. अल्लाह प्रत्येक गोष्टीचा हिशोब ठेवणारा आहे. *(कुरआन ४:८०*

हे श्रद्धावंतांनो ! न्यायावर दृढ राहणारे आणि अल्लाहसाठी साक्षीदार बना. यद्यपि तुमच्या न्यायाचा व तुमच्या साक्षीचा आघात तुम्हा स्वतःवर अथवा तुमच्या आईबापांवर व नातेवाईकांवर जरी होत असेल तरीदेखील, प्रकरणातील (घटनेतील) पक्षकार मग तो श्रीमंत असो अथवा गरीब, अल्लाह तुमच्यापेक्षा जास्त त्यांचा हितचिंतक आहे. *(कुरआन ४:१३५)*

आणि ज्यांना विवाहाची संधी उपलब्ध नसेल त्यांनी संयम अंगिकारावा येथपावेतो की अल्लाह आपल्या कृपेने त्यांना समृद्ध बनवील. *(कुरआन २४:३३)*

हे ते लोक आहेत ज्यांना त्यांचा मोबदला दोन वेळा दिला जाईल. त्या दृढतेबद्दल जी त्यांनी दाखविली. ते वाईटाचे भल्याने निवारण करतात आणि जी काही उपजीविका त्यांना आम्ही दिली आहे त्यातून (आमच्या मार्गावर) खर्च करतात. *(कुरआन २८:५४)*

आणि श्रद्धावंतापैकी दोन गटात भांडण झाल्यास, त्यांच्यात समेट घडवून आणा. *(कुरआन ४२:९)*

बघा, कुरआन माता-पिता, नातेवाईक, अनाथ, दीनहीन व शेजाऱ्यांशी कसा व्यवहार करावा याबाबत काय उपदेश देतो.

आठवण करा, ईस्त्राइल कडून आम्ही दृढ वचन घेतले होते की अल्लाह शिवाय अन्य कुणाचीही उपासना करणार नाही. मातापित्याशी, नातेवाईकांशी, अनाथ व गोरगरीबांशी चांगले वागतील. लोकांना चांगल्या गोष्टी सांगतील. नमाजचे पालन करतील आणि जकात देतील. परंतु थोडे लोक वगळता तुम्ही सर्वांनी ह्या वचनांकडे पाठ फिरवली. आणि अजून फिरवीत आहात. *(कुरआन २:८३)*

लोक त्यांना (प्रेषितांना) विचारतात की आम्ही किती खर्च

करावा ? "तुम्ही सांगा" जे काही तुम्ही खर्च कराल तो आईवडिलांवर, नातेवाईकांवर, अनाथ आणि गोरगरीबांवर आणि वाटसरुंवर खर्च करा आणि जे काही भले तुम्ही कराल ते अल्लाहला माहीत असेल. *(कुरआन २:२१५)*

तुझ्या पालनकर्त्याने निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणाचीही भक्ति करु नये परंतु केवळ त्याची. आईवडिलांशी सद्‌वर्तन करा, जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी ब्र शब्द देखील काढू नका व त्यांना झिडकारून प्रत्युत्तर देखील देऊ नका. त्यांच्याशी आदरपूर्वक बोला आणि नम्रता व दयाभावाने व्यवहार करा. *(कुरआन १७-२३, २४)*

हे श्रद्धावंतानो, नातेवाईकास त्याचा हक्क द्या आणि गरीब व वाटसरुंना (त्यांचा हक्क द्या) ही उत्तम पद्धत आहे त्या लोकांसाठी जे अल्लाहची प्रसन्नता इच्छितात. आणि तेच सफल होणार आहेत. *(कुरआन ३०:३८)*

अनाथांची संपत्ती त्यांना परत करा. (त्यांच्या) चांगल्या मालाला वाईट मालाने बदलू नका, आणि त्यांचा माल आपल्या मालात मिसळून खाऊ नका (हडप करु नका) हा फार मोठा गुन्हा आहे. *(कुरआन ४:२)*

एखाद्याचा मातेला गुलामीतून मुक्त करणे वा उपासमारीच्या काळात (नात्यातील) अनाथाला, वा दुर्दशाग्रस्तास (धुळीत पडलेल्यास) वा दीन हीनास भोजन देणे म्हणजे श्रद्धावानात गणले जाणे होय व एकमेकाला संयम व दयेचा उपदेश देणारे उजव्या बाजूचे आहे. *(कुराआन ९०-१३ ते १९)*

कुरआनने या पुढे जाऊन दांपत्य जीवन सुखी व आदर्श व्हावे म्हणून म्हटले आहे.

तो अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले व त्याच्याच जातीपासून जोडी बनविली म्हणजे तिच्या सानिध्यात संतोष प्राप्त करावा. मग जेव्हा पुरुषाने स्त्रीला झाकले तेव्हा तिला एक सूक्ष्म गर्भ राहिला. त्याचा भार वाहून ती संचार करीत राहिली. मग जेव्हा तिचा तो भार वाढला तेव्हा दोघांनी मिळून अल्लाहकडे (पालनकर्त्याकडे) प्रार्थना केली की, जर तू आम्हाला चांगले मूल दिलेस तर आम्ही तुझे कुतज्ञ राहू. *(कुरआन ७-१८०)*

हे श्रद्धावंतानो, तुमच्या करिता है वैध नाही की तुम्ही बळजबरीने स्त्रियांचे मालक व्हावे आणि हे देखील वैध नाही की त्यांना त्रस्त करुन त्या स्त्रीधनाचा काही भाग तुम्ही हिरावून घ्यावे जो तुम्ही त्यांना देऊन टाकला आहे. परंतु जर त्या उघडपणे अश्लील कृत्य करतील तर (तुम्हाला जरुर त्यांना त्रास देण्याचा अधिकार आहे) त्यांच्याशी चांगल्या प्रकारे जीवन व्यतीत करा. जर त्या तुम्हाला पसंत नसतील तर शक्य आहे की एखादी गोष्ट तुम्हाला पसंत नसेल परंतू अल्लाहने बरेचसे भले ठेवले असेल. *(कुरआन ४:१९)*

त्यांना (इद्दतच्या काळांत) त्याच जागी ठेवा जेथे तुम्ही राहता जशी जागा तुमच्याकडे उपलब्ध असेल आणि त्यांना अडचणीत आणण्यासाठी त्रास देऊ नका. आणि त्या जर गर्भवती असतील तर त्यांच्यावर त्या वेळेपर्यंत खर्च करीत रहा जोपर्यंत त्या गर्भमुक्त होत नाहीत. मग जर त्या तुमच्यापाशी (बाळाला) दूध पाजतील तर त्याचा मोबदला त्यांना द्या, आणि भल्या प्रकारे (मोबदल्याचा प्रश्न) परस्पर सल्लामसलतीने ठरवा. *(कुरआन ६५:६)*

# इस्लाम व अहिंसा

## ('फराज' सुलतानपुरी)

इस्लाम धर्माच्या बाबतीत सर्वसामान्यपणे बरेच विचित्र विचार बाळगले जातात. काही लोक समजतात की इस्लाम केवळ रक्तपात व हिंसावादी धर्म आहे. परंतु सत्य काही वेगळेच आहे. इस्लाम खरे पाहता शांतिचा संदेश देतो. तो मानवास शांतिचा मार्ग दाखवितो. इस्लाम जुलूम, अत्याचार, पक्षपात व उपद्रवाचा विरोधक आहे. इस्लाम जगातून दुराचार नष्ट करुन कल्याणकारी वातावरण निर्माण करु इच्छितो. इस्लाम सत्य, न्याय, अहिंसा व शांतिचा समर्थक आहे. इस्लाम या शब्दाचा अर्थच मुळी शांति, सुधारणा व निर्मिती असा आहे. त्यास अव्यवस्था नको आहे. इस्लामचा एक अर्थ आहे - विनम्रता, विनीत, आज्ञापालन आदि. इस्लामचा दूसरा प्रसिद्ध अर्थ आहे "तडजोड, शांति, कुशलता, संरक्षण, शरण आदि." प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे "इस्लामचा स्वीकार करा (विध्वंसापासून) सुरक्षित व्हाल." त्यांनी असे ही म्हटले की जी व्यक्ति इस्लाम स्वीकारते सुरक्षित होते."

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या बाबतीत कुरआनात म्हटले आहे.

**आणि (हे मुहम्मद ! स.) आम्ही तुम्हास संपूर्ण जगाकरिता 'रहमत' (कृपा) म्हणून पाठविले आहे.** *(सूरह अल अंबिया आ.१०७)*

विचार करा जो जगवासियांकरिता सर्वथः कृपा स्वरुपात आला आहे त्याची शिकवण हिंसात्मक कशी असू शकेल. प्रेषित मुहम्मद(स.) यांची शिकवण अत्यंत व्यापक व संपूर्ण मानव समाजासाठी आहे. अशी शिकवण जी संपूर्ण जगवासियांकरिता कल्याणकारी आहे. हिंसात्मक होऊच शकत नाही. कुरआनच्या निम्न आयतीचे वाचन करा व बघा की इस्लामची शिकवण किती शांति प्रिय आहे.

आपल्या पालनकर्त्याला हाक मारा, विनवणी करुन आणि मौनपणे. निश्चितच तो मर्यादाचे उल्लंघन करणाऱ्याला पसंत करीत नसतो. सुधारणा झालेल्या पृथ्वीवर हिंसाचार माजवू नका, जेव्हा त्यात सुधारणा झालेली आहे आणि ईश्वरालाच हाक मारा, भय आणि अभिलाषेने, खचितच अल्लाहची कृपा लोकांच्या निकट आहे.

(कुरआन सूरह ७-५५ व ५६)

जेव्हा त्यांना सांगितले जाते की पृथ्वीवर अनाचार माजवू नका तेव्हा ते म्हणतात की 'आम्ही तर सुधारणा करणारे आहोत!' सावधान! हेच लोक अनाचारी आहेत, परंतु त्यांना ते कळत नाही.

(कुरआन २:११-१२)

अल्लाहने दिलेल्या उपजीविकेचा उपभोग घ्या आणि पृथ्वीवर अनाचार माजवत फिरु नका. (कुरआन २:६०)

व जेव्हा तो परत येतो तेव्हा पृथ्वीवर त्याची सारी धावपळ उपद्रव पसरविण्यासाठी असते. त्याला गती व वंशाचा संहार करावयाचा असतो. अल्लाहला मात्र उपद्रव माजवणारे आवडत नाही. (कुरआन)

उपकार कर, ज्याप्रकारे अल्लाहने तुझ्यावर उपकार केले आहेत आणि जमीनीवर उपद्रव माजविण्याचा प्रयत्न करु नकोस. अल्लाहला उपद्रवी आवडत नाही. (कुरआन २८:७७)

हे श्रद्धावंतानो! आपसांत एकमेकांची संपत्ती खोट्या पद्धतीने खाऊ नका. व्यवहारा झाला पाहिजे परस्परांच्या राजीखुशीने आणि स्वतःचा आत्मघात करु नका. (कुरआन ४:२९)

अल्लाह-न्याय, भले कृत्य आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो, आणि दुष्कर्म व स्वैराचार आणि अन्याय व अत्याचाराची मनाई करतो, तुम्हाला उपदेश करतो जेणेकरुन तुम्ही बोध घ्यावा. (कुरआन १६:९०)

कुरआनातील उपरोक्त ओवींनी लक्षात येते की इस्लामचा हिंसात्मक दृष्टिकोन मुळीच नाही. तो तर लोकांना सत्य, न्याय, शांति, एकता, प्रेम, ईशवंदन व भक्तिमार्गाकडे आमंत्रित करतो जेणेकरुन मानव जीवन सुखमय, स्वच्छ व सफल व्हावे.

आता प्रेषित मुहम्मद (स.) यांचे उपदेश ऐका. प्रेषित मुहम्मद (स.) म्हणतात.

१) ''मी या करिता पाठविला गेलो आहे की मी (लोकांना) सुस्वभावी व सौजन्यशील बनवावे।''

२) आपल्या साथीदारांमध्ये अल्लाहच्या दृष्टीत सर्वात चांगला तो आहे जो आपल्या साथीदारांचा हितकर्ता आहे व अल्लाहच्या दृष्टीत शेजाऱ्यांमध्ये तो सर्वात चांगला आहे जो शेजाऱ्यांचा हितकर्ता आहे.

३) प्रेषित मुहम्मद (स.) ने म्हटले आहे की हजरत मूसा (स.) ने म्हटले हे पालनकर्त्या ! तुला तुझ्या दासां (लोकां) पैकी कोण प्रिय वाटतो ? अल्लाहचे उत्तर होते ''जो शक्ति असून ही (शत्रूला) क्षमादान करतो !''

४) प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले की अल्लाह मृदू व्यवहार करणारा आहे. मृदुता (दयाभाव) पसंत करतो व दयाभावाला तो पुरस्कृत करतो. दयाभावा व्यतिरिक्त इतर कर्मांना (इतका) पुरस्कार देत नाही.

५) प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले की ती व्यक्ति आमच्यापैकी नाही जी छोट्यांवर दया करीत नाही, मोठ्यांचा आदर करीत नाही, सत्कर्मांचा आदेश देत नाही व दुष्कर्मांना आटोक्यात आणत नाही.''

६) प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले की खिलकत (जगातील लोक) अल्लाहचे कुटुंब आहे व अल्लाहला ती व्यक्ति सर्वात प्रिय आहे जो त्याच्या परिवाराशी चांगला व्यवहार करतो.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पशु व जीवाणूंशी ही दयेचा व्यवहार

करण्याचे आदेश दिले आहेत. एकदा ते प्रवास करीत होते. त्यांच्या साथीदारांपैकी एकाने एका पक्ष्यास दोन पिलांसह पाहिले. त्याने दोन्ही पिलांना पकडले. चिमणी वेड्यागत चिवचिवाट करु लागली. प्रेषित मुहम्मद (स.) ने दृश्य पाहताच विचारले की या चिमणीचे पिले पकडून तिला कोणी दुखावले आहे. तिची पिल्ले परत करा. एकदा ते म्हणाले की अल्लाहने एका मांजरीसाठी एका महिलेस शिक्षा दिली कारण तिने मांजरीला बांधून ठेवले होते ज्यामुळे ती मरण पावली. ती महिला त्या मांजरीस सोडतही नव्हती व खायला ही देत नव्हती.

उपरोक्त 'हदीस' (प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कथन) वरुन लक्षात येते की इस्लामला प्रेम, अहिंसा व सदाचाराची अपेक्षा होती. मात्र याचा अर्थ असा होत नाही की सत्यासत्याच्या संघर्षात सत्याची साथ देऊ नये. सत्य व अहिंसेच्या रक्षणार्थ कधी कधी बलप्रयोग करावा लागतो. या बलप्रयोगास अहिंसाविरोधी मानता येणार नाही. इस्लाममध्ये युद्धाची जर अनुमति दिली गेली असेल तर ती न्याय व अहिंसेच्या रक्षणार्थ व सत्याच्या स्थापनेसाठी दिली गेली आहे. या आदेशाचा दूसरा कोणता ही उद्देश नाही. उदाहरणार्थ कुरआनच्या निम्न आयतीचे अध्ययन करा.

**तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या असहाय्य पुरुष, स्त्रिया व बालकांसाठी का लढत नाही जे दुर्बल असल्यामुळे छळले गेले आहेत आणि याचना करीत आहेत की, हे पालनकर्त्या ! आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ, कारण येथील रहिवाशी अत्याचारी आहेत. तू तुझ्याकडून एखादा रक्षण करणारा मदतगार पाठव.** *(कुरआन ४:७५)*

**आणि अल्लाहच्या मार्गात त्या लोकांशी लढा जे तुमच्याशी लढतात परंतु अतिरेक करु नका. अल्लाहला अतिरेक करणारे आवडत नाहीत.** *(कुरआन २:१९०)*

# इस्लामची सामाजिक व आर्थिक व्यवस्था

इस्लाम केवळ एक तत्वज्ञान नाही, केवळ संस्कृति नाही, नुसता कल्पनाविलासही नाही व केवळ नियमावली ही नाही. इस्लामकडे एक अशी आचारसंहिता आहे ज्यात सामाजिक व आर्थिक व्यवस्थेचीही तरतूद आहे. त्याची सामाजिक व्यवस्था मानवीय समतेवर आधारित असून अर्थ-व्यवस्था न्यायसंगत आहे.

इस्लामी सामाजिक व आर्थिक व्यवस्थेचे संक्षिप्त विवरण असे आहे.

लक्षात असू द्या की मानवी जीवनात अनेकविध समस्या आहेत. त्यापैकी आर्थिक समस्या एक आहे. मानवाच्या वेगवेगळ्या गरजांपैकी आर्थिक सक्षमता महत्वाची बाब आहे. म्हणूनच केवळ आर्थिक लाभास मुसलमानानी महत्व न दिल्याचा इतिहास आहे. आम्हाला मानवता व नैतिक मूल्यांमध्ये मूल्य अधिक रुचि असल्याचा इतिहास दिसून येईल. मानवाच्या आर्थिक गरजांबरोबरच मानसिक, अध्यात्मिक, भौतिक, विविध सामाजिक बाबीही महत्वाच्या आहेत.

अर्थव्यवस्थेबाबत विचार करतांना काही आवश्यक गरजांच्या सर्व प्रथम विचार करायला हवा. आहार अन्न अर्थात् भोजन आमची महत्वाची गरज आहे. भोजनाची आवश्यकता केवळ आत्मा व शरीराचा संबंध कायम राखण्यासाठी नसून जिवंत राहण्याकरिता ही आवश्यक आहे. सशक्त शरीर असेल तर मानवीय जीवनाच्या संस्कृति व प्रगतिला योग्यरित्या हातभार लाऊ शकू. भोजनासह 'आम्हास वस्त्रांचीही गरज असते. वस्त्राने शरीरतर झाकलेच जाते त्याचबरोबर शरीराचे संरक्षण होऊन शोभाही वाढते. आम्हाला योग्य अशा निवासस्थानाचीही गरज असते. आमच्या मानसिक, भौतिक व नैतिक कल्याणासाठी योग्य अशा ज्ञान व शिक्षणाची गरज असते. शरीर

स्वस्थ्य राहावे म्हणून औषधोपचाराची ही गरज असते. तसेच आम्हाला आंतरिक तसेच बाह्य सुरक्षा प्राप्त असणे ही गरजेचे असते. जीवनाच्या सर्व मुलभूत गरजा इस्लामच्या परिभाषेत अर्थात् ''जरुरियात सित्ता'' (अर्थात सहा मुलभूत गरजा) समाविष्ट आहेत. शासनाचे कर्तव्य आहे की आपल्या सर्व धार्मिक नागरिकांच्या मूलभूत गरजा प्रामाणिकपणे पूर्ण कराव्यात जर आज काही मुस्लिम राष्ट्रे या कर्तव्यांचे काटेकोरपणे पालन करत नसतील तर ते इस्लामी कर्तव्यांच्या पालनात असफल असल्याचे सिद्ध होते. या उलट जर मुस्लिमेतर शासक या कर्तव्यांचे योग्य रित्या पालन करीत असतील तर ते इस्लामी कर्तव्यांचे पालन करताहेत असे मानावे लागेल.

इस्लाम सामाजिक विकासाच्या सहज प्रवृत्तीत कोणतीच बाधा निर्माण करु इच्छित नाही. वेगवेगळ्या व्यक्तींच्या योग्यते व क्षमतेनुसार त्यांना स्वतंत्रपणे प्रगति करण्याचाच नव्हे तर त्यांना प्रोत्साहित करण्याचे कार्य करतो. नि:पक्षपात सहाय्यता इस्लामचा सामाजिक-आर्थिक मूलाधार आहे. मात्र इस्लाम अमर्याद स्वच्छंद कार्याचे समर्थन करीत नाही. त्यांत स्वच्छंद एकाधिकारास अनुमति नाही. इस्लाम समाजातील ठराविक मोजक्या लोकांच्या हातात संपत्तीच्या संग्रहाचे समर्थन करीत नाही. धन संपत्तीचे समाजात समानरित्या वाटप व्हावे अशी इस्लामची अर्थव्यवस्था आहे. जकात (दान) चे अनिवार्यकरण याच दिशेत केलेले अतुलनीय प्रयत्न आहे. वारसा हक्काच्या नियमाने धनसंपत्तीचे कुटुंबातील सदस्यांत (सर्व स्त्री पुरुषात) न्यायसंगत वाटप केले जाते.

आर्थिक व्यवस्था जर योग्य रित्या सांभाळली गेली नाही तर स्वार्थी व लोभी लोक संपूर्ण समाजास दूषित करुन टाकतील.

इस्लाम सरळ व साध्या जीवनास प्राधान्य देतो. ऐश्वर्याचे प्रदर्शन करण्याची इस्लाम निंदा करतो. संयमित जीवनास प्रोत्साहन देऊन भ्रष्टाचार

व दूषित व्यवहाराला आळा बसविण्याचे प्रयत्न करतो.

इस्लाम आमच्या जीवनांत स्वच्छता व शुद्धता निर्माण करु इच्छितो. म्हणूनच कुरआनांत व्यापाऱ्यांना आदेश देण्यात आले आहेत,

**न्यायपूर्ण रीतीने ठीक ठीक वजन करा आणि तराजूने तोलताना वजन कमी करु नका.** *(कुरआन ५५:९)*

**आणि वजन कराल तेव्हा ठीक तराजूने वजन करा ही चांगली पद्धत आहे आणि परिणामाच्या दृष्टीने देखील हेच उत्तम आहे.**

*(कुरआन १७:३५)*

**लोकांना वस्तू देताना योग्य मोजमाप करा व सुधारित भूतलावर उपद्रव निर्माण करु नका.** *(कुरआन)*

दुसऱ्या ठिकाणी आले आहे.

**विनाश आहे काटा मारणाऱ्यासाठी** *(कुरआन ८३:१)*

कुरआन सक्तीने संपत्तीच्या अपव्ययाबाबत निषेध व्यक्त करतो.

कथन आहे,

**आपली संपत्ती उगीचच खर्च करु नका** *(कुरआन)*

**वायफळ खर्च करणारे सैतानाचे बंधू आहेत**

*(कुरआन : १७:२७)*

इस्लाममध्ये जुगाराला मज्जाव (निषेध) आहे. इस्लाम शीघ्र गतीने पैसे निर्माण करणाऱ्या मशीनींचा निषेध करतो. प्रेषित (स.) यांनी म्हटले आहे.

''जे लोक सुमार्गाने उपजीविका चालवितात ते ईश्वराला प्रिय असतात.''

साठेबाजी (Hoarding) ला आर्थिक अव्यवस्थेचे मूळ कारण मानले जाते. प्रेषित (स.) ने त्यास निंदनीय मानले आहे. त्यांनी म्हटले आहे.

''जो सामान खरेदी करुन स्वस्त दरात विकतो तो जास्त नफा कमवितो व जो सामान खरेदी करुन उच्च दराने विकण्यासाठी साठवून ठेवतो तो ईश्वराच्या कोपास पात्र ठरतो.''

धनसंचयाबाबत कुरआनात कथन आहे,

''जे लोक सोने व चांदीची साठेबाजी करतात व ईश्वराच्या मार्गात खर्च करीत नाही त्यांना भयंकर यातना दिली जाईल.

याच कारणामुळे स्वच्छंद एकाधिकारास प्रेषित (स.) यांनी निंदनीय मानले आहे व म्हटलंय,

''जो व्यापारात एकाधिकारी होऊन बसतो तो गुन्हेगार आहे.'' त्यांनी असे ही म्हटलंय,

'एकाधिकारी (Holder or Monoppoly) गुन्हेगारी व उल्लंघण करणारा आहे.''

श्रमाविषयी प्रेषित (स.) ने आपल्या सेवकाशी आदर्श व्यवहार तर केलाच केला आहे. त्याचबरोबर उपदेश केला आहे की नोकरांशी दयाभावाने उदारपणे व योग्य असा व्यवहार करावा. त्यांनी म्हटलंय की जे तुम्ही नेसाल तसेच आपल्या सेवकांना नेसायला द्या. त्यांनी आपल्या सेवकांना योग्य ते शिक्षण देण्याबाबत ही उपदेश दिला आहे. त्यांना आपल्या बांधवासारखी वागणुक द्या. त्यांनी म्हटले आहे की ''मजूराची मजूरी त्याचा घाम सुकण्यापूर्वी अदा करा' जर यापैकी काही आदेशांचे पालन केले गेले तर श्रमासंबंधी समस्यांचे निराकरण होईल व असंतोष ही संपुष्टात येईल. श्रमासंबंधी समस्या निर्माण होण्याचे मूळ कारण हे आहे की आम्ही विसरतो की मजूर सुद्धा आमच्या सारखीच माणसे आहेत व आमचे बांधव आहेत.

जर आम्ही स्वार्थांध झालो नसतो तर परिस्थिति वेगळी असती. प्रेषित (स.) यांनी सर्व प्रथम श्रमाच्या प्रतिष्ठेची शिकवण दिली. ते स्वतःची पादात्राणे स्वतःच दुरुस्त करीत असत. आपल्या वस्त्रांना स्वतःच थिगळ लावत असत. आपल्या शेळ्यांचे स्वतः दूध काढीत असत. हे सर्व त्यांनी त्याकाळी करुन दाखविले जेव्हा ते सर्वोच्च अधिकार प्राप्त करुन उच्च दर्जाचे मालक झाले होते. ते दुसऱ्यांच्या सहाय्यतेसाठी नेहमीच तत्पर असत. त्यांचे भाष्य किती सुरेख आहे की, जी व्यक्ति दुसऱ्यांकरिता काम न करता केवळ स्वतःकरिता झटत असते ती ईश्वराच्या पारितोषिकांपासून वंचित राहील.

जेव्हा धनवान व्यक्ति निर्धन लोकांची विनवणीकडे दुर्लक्ष करतात तेव्हा त्यांची उपेक्षा अविश्वास, असंतोष व नैरास्याच्या भावनेस जन्म देते व पुढे जाऊन रक्तपात व क्रांतिला कारणीभूत ठरते. इस्लाम अशा प्रकारची दोषयुक्त समाजव्यवस्था निर्माण होऊ नये म्हणून न्यायसंगत शुद्ध सामाजिक अर्थव्यवस्था अंमलात आणतो.

इस्लाम ज्याप्रकारे कम्युनिझमच्या सक्तीचा व दडपशाहीचा विरोध करतो त्याचप्रमाणे भांवलशाही व शोषना (Exploitation) चा ही विरोध करतो. इस्लाम समूहवाद वा समाजवादात विश्वास करीत नाही तसेच व्यक्तिवादाबाबत ही त्यास आस्था नाही. इस्लाम दोहोंचा समन्वय साधून स्वस्थ संतुलित व सामंजस्याचे वातावरण निर्माण करु पाहतो. मात्र इस्लामच्या सामाजिक-आर्थिक-व्यवस्थेत त्याच्या मूलभूत तत्वांपासून वेगळे करता येत नाही. यासाठी आपली संपूर्ण जीवन व्यवस्था इस्लामी होणे आवश्यक आहे. जीवनाच्या एका भागास इस्लामी स्वरुप द्यावे व बाकीच्या भागास सोडून देण्यात यावे हे अव्यवहारिक व अमान्य व्यवस्था सिद्ध होईल.

# आर्थिक शोषणाचा विरोध

**(सुरेंद्र सिंह कादियाण – दिल्ली)**

जेव्हा अधर्माचा प्रभाव वाढला जातो तेव्हा एक मनुष्य दुसऱ्या माणसाला हडप करण्याचा प्रयत्न करतो. धर्माच्या अभावाने धन-संपत्तीचा योग्य विनियोग होत नाही. भारतात जोवर वैदिक संस्कृति अस्तित्वात होती तोवर यज्ञ जीवनाचा सलग भाग होता व धर्माचा वास्तविक लाभ प्राप्त होत राहिला. यज्ञाचा अर्थच एकत्रित प्रयत्नाने धनप्राप्ती करणे, समान वाटप करुन सर्वांनी भोग घेणे - असा होता. धनदौलत एका विशिष्ट वर्गाच्या अर्थात् सामर्थ्यवानाकडे एकत्रित होत गेली व सर्वसामान्य मनुष्य निर्धन होत गेला. आर्थिक शोषणाने श्रीमंताना इतके निश्चित करुन टाकले होते की काबाडकष्ट करणे त्यांना अपमानजनक वाटे. अशा भयंकर स्थितीत कुरआनने लोकांना आवाहन केले की उठा व कार्यरत व्हा, कारण अल्लाहचा 'दीन' (इस्लाम) परिश्रमासाठीच अवतरला आहे.

**आणि आम्ही दिवसाला उपजीविकेची वेळ बनविली.**

*(कुरआन ७८:११)*

वर म्हटल्याप्रमाणे धनसंपत्ती काही लोकांच्या हातात सीमित झाली होती व तिचा अवैध उपयोग केला जात होता. कुरआनने त्याच्या विरुद्ध नीतिचा अवलंब केला जेणेकरुन धन-संपत्ती एका ठिकाणी गोठली जावू नये. उलट ती सर्वत्र पसरली जावी व लोकांच्या दृष्टीने हितकारक सिद्ध व्हावी. हिंदू शास्त्रात ही असेच निर्देश देण्यात आले आहेत की जे धनवान आहेत व लोककल्याणासाठी संपत्ती खर्च करीत नाहीत त्यांना संपत्ती बाळगण्याचा अधिकार नाही. हिंदू धर्मियांमध्ये प्रसिद्ध धारणा आहे की जमिनीत पुरलेल्या खजिन्यावर सापांचा कब्जा असतो, त्याच्या मागे हीच भूमिका आहे. अर्थात जे धनवान लोकहितासाठी संपत्तीचा वापर करीत नाहीत ते सापासमान आहेत (अर्थात ते सापासमान माणसाचे शत्रू आहेत)

कुरआनात म्हटले आहे की युद्धात जी संपत्ती मुसलमानास प्राप्त होत होती ती संपत्ती समाजाच्या उत्कर्ष व उन्नतिसाठी उपयोगात आणावी.

**तुम्हाला अन्फाल (युद्धात प्राप्त अधिक गनिम-माल) बाबत विचारता, सांगा "हे अनफाल तर अल्लाह आणि त्याच्या प्रेषिताचे आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा व आपापसातील संबंध सुधारा आणि अल्लाह व त्याच्या प्रेषिताची आज्ञा पाळा.** *(कुरआन ८:१)*

लढाईत प्राप्त धनाचा उपभोग व वाटप कशा प्रकारे केला जावा या संबंधात कुरआनातील निर्देश,

**आणि तुम्हाला माहित असावे की जो काही गनिमी माल तुम्ही प्राप्त केला आहे त्याचा पाचवा वाटा अल्लाह व त्याचे प्रेषित (स.) व नातेवाईक व अनाथ व गोरगरीब व वाटसरु यांच्या करिता आहे. जर तुम्ही श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहवर आणि त्या गुप्त मदतीवर जी निर्णयाच्या दिवशी अर्थात् दोन्ही सैन्याची गाठ पडण्याच्या दिवशी आम्ही आमच्या दासांवर अवतरली होती (तर हा वाटा स्वखुशीने अदा करा) अल्लाह सर्व गोष्टींना समर्थ आहे.** *(कुरआन ८-४१)*

धनसंपत्तीचा उपयोग मानव समाजाचे जोवर अहित करीत नाही तोवर तो वैध आहे. प्रेषित मुहम्मद (स.) व अन्य खलिफांकडे अपार धनसंपत्ती होती, परंतु त्यांनी "साधे जीवन-उच्च विचारांचे" लक्ष्य डोळ्यासमोर ठेवले होते. त्यांनी ज्या प्रकारच्या साध्या राहणीमानाचे उदाहरण जगापुढे मांडले आहे त्या समान संपूर्ण विश्वाच्या इतिहासात कुठेच दिसून येत नाही."

"सूफीमत-साधना व साहित्य" या पुस्तकात रामभजन तिवारी यांनी लिहिले आहे.

"प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याबद्दल अशी घटना आहे की एके दिवशी ते फाटका सदरा घालून घरी आले व आयशा (रजि.) यांना सांगितले

की हा सदरा नष्ट करु नकोस याला थिगळ लाऊन टाक. याच प्रकारे जेव्हा हजरत अबू बक्र खलीफा झाले तेव्हा ते एका कपड्याला दोन ऑलपिन लाऊन शरीर आच्छादित करीत म्हणून त्यांना "ऑलपिन वाले" म्हटले जात असे. एका मोठ्या इस्लामी साम्राज्याचे शासक असूनही उमर बिन खत्ताब (रजि.) रोटी व जैतून (ऑलीव) चे तेल खाऊन जीवन व्यतीत करीत असत. त्यांच्या कपड्यावर दहा बारा थिगळे असत. हजरत उस्मान (रजि.) साधे कपडे घालीत असत. कोणत्याच प्रकारचा बडेजावपणा त्यांच्या पोषाखात दिसूत येत नसे. त्यांचे कपडे त्यांच्या गुलामासारखेच असत. हजरत अली (रजि.) जेव्हा खलीफा झाले तेव्हा त्याच्या झग्याच्या बाह्या हातापेक्षा लांब झाल्या तेवढा वाढीव भाग त्यांनी चाकूने कापून टाकला.

रोमची प्रगति साधेपणा, कमी खर्चामुळे झाला होता व ऐश्वर्य व अतिखर्चिकपणामुळे पतन झाला. धर्म माणसाला विनम्र, संयमी, साधी राहणीमानाची प्रेरणा देतो. हीच शिकवण कुरआनात दिली गेली आहे. चित्रकला व संगीताच्या याच कारणामुळे कुरआनात निषेध करण्यांत आला आहे कारण या छंदामुळे मनुष्य साधेपणापासून दुरावला जातो व रसिक बनतो. संपत्तीचा अपव्यय करणाऱ्यास कुरआन (सूरह बनी इसराईल आ.२७) मध्ये सैतानाचा भाऊ म्हटले आहे.

साधेपणा आर्थिक शोषणाचा गंभीरपणे विरोध करते. साधेपणानंतर ज्या दुसऱ्या तत्वाने अरबस्तानातील गरीब जनतेची दुर्दशा संपुष्टात आणली होती ते होते 'दान'. अरबस्तानातील धनवान लोक म्हणत असत की निर्धन लोकांना आम्ही आमच्या कमाईतून दान का द्यावे, जेव्हा स्वतः ईश्वराने त्यांना खायला दिलेले नाही. त्यांना खायला द्यायचे असते तर त्यांने स्वतः दिले असते. या लोकांना खायला देणे म्हणजे ईश्वराच्या इच्छेविरुद्ध कार्य करणे होय. या तर्कास कुरानाच्या सूरह ३६ च्या आयत क्र. ४७ ने खोडून काढून आदेश देण्यात आला आहे की "असे लोक पूर्णतः पथभ्रष्ट आहेत." इतर अनेक

आयतीत या संदर्भात खुलासा दिला गेला आहे. कुरआनात गुप्त दानाचे विशेष महत्व आहे कारण यामुळे दान देणाऱ्याच्या मनात उगीचच अभिमान निर्माण होत नाही व दान घेणाऱ्यास लज्जित झाल्याचा भास होत नाही. सूरह बकराची आयत क्र. २६१ मध्ये याबाबत स्पष्ट आदेश देण्यात आले आहे.

**जे लोक आपला माल अल्लाहच्या मार्गात खर्च करतात आणि खर्च केल्यानंतर मग उपकार दर्शवीत नाहीत आणि दु:ख देत नाहीत त्याचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ आहे आणि त्यांच्याकरिता कोणतेही दु:ख आणि भयाचे प्रसंग नाही.** *(कुरआन २:१६१)*

अरबांना आर्थिक पारतंत्रातून मुक्ति मिळवून देण्याकरिता जो पुढील आदेश आला होता तो म्हणजे व्याज वसूल करणे वा व्याजावर पैसे देण्यास अवैध मानणे.कुरआनने हा मोठ्या तत्परतेने क्रियान्वित केला.

कुरआनात व्याज बट्ट्याचा व्यवहार करणाऱ्याबद्दल अतिशय तुच्छतेने उल्लेख करण्यात आला आहे. याच मार्गाने एक मनुष्य दुसऱ्या माणसाचे हळूहळू रक्त शोषण करीत असतो व त्याचे जीवन कष्टमय करुन टाकतो. कुरआनने व्याज वसूल करणाऱ्याला कठोर दंडास पात्र ठरविले आहे.

**परंतु जे लोक व्याज खातात त्यांची दशा त्या माणसाप्रमाणे असते ज्याला शैतानाचे स्पर्श करुन झपाटून सोडले आहे आणि ते या दशेत गुरफटण्याचे कारण हे आहे की ते म्हणतात, "व्यापार देखील शेवटी व्याजासारखाच व्यवहार आहे." वास्तविक पाहता अल्लाहने व्यापाराला वैध केले आहे आणि व्याजाला निषिद्ध. म्हणून ज्याला त्याच्या पालनकर्त्या कडून हा उपदेश मिळेल आणि तो भविष्यात व्याज खाण्यापासून परावृत्त होईल तर जे काही त्याने पूर्वी खाल्ले असेल ते जाऊ द्या. त्याचा निर्णय अल्लाहच्या अधीन आहे. जो या आज्ञेनंतर ही त्याच व्यवहारची पुनरावृत्ती करील तो नरकवासी आहे, जेथे तो सदैव राहील.** *(कुरआन २:२७५)*

# कुरआन हा नवीन धर्म नव्हे

**(अंजुम सिद्दिकी - आजमगढ़-उ.प्र.)**

बरेच लोक अज्ञानामुळे असे समजतात की इस्लाम हा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्थापन केलेला एक नवा धर्म आहे. हे त्यांचे चुकीचे मत आहे. इस्लाम हा नवा धर्म मुळीच नाही. हा तर सत्य प्रिय लोकांचा व प्रेषितांचा धर्म आहे. विविध भाषांमध्ये विविध काळांत याचे नाव वेगवेगळे राहिले असेल. पण वास्तविकतेच्या दृष्टिकोनातून सत्य धर्म एकच राहिला आहे. सत्यधर्माची मुलभूत तत्वे एकच होती. कर्मकांड व जीवनाच्या विविध क्षेत्रासंबंधी नियमात व वैचारिक पातळीवर परिवर्तन होत राहिलेत; हे जरी खरे असले तरी मुलभूत तत्वात फरक झालेला नाही. फरक होणे शक्य ही नाही कारण मुलभूत तत्वांत फरक झाल्याचे धर्माचे स्वरुपच पार बदलून जाते. धर्माचा खरा संबंध जीवनाच्या वास्तविक तथ्य व मानवी स्वभावाशी असतो. जगाच्या वास्तविक तथ्यांत व मानवी स्वभावात व मानवी प्रवृत्तीत जर परिवर्तन होत नाहीत तर धर्माच्या मूलभूत स्वरुपात त्याच्या मूळ शिकवणीत बदल कसा घडू शकेल. ईश्वराकडून पाठविलेल्या प्रेषित व संदेशवाहकांनी एकमेव ईश्वराची उपासना व त्याच्या आदेशांचे पालन करण्याचा संदेश दिला आहे. सर्व लोकांनी इतस्तत: भटकण्याऐवजी या गोष्टीकडे आकर्षित केले की ईश्वर व प्रेषितांच्या मार्गाचा अवलंब करुन जीवन सार्थक करावे व ईश्वरीय कोपापासून सुरक्षित व्हावे व त्याची प्रसन्नता व सानिध्य प्राप्त करण्याची चेष्टा करावी. याचबरोबर प्रेषितांनी ईश्वराच्या वतीने मानवांना सूचित केले की ऐहिक जीवन हे अल्पकालीन जीवन असून मृत्यु नंतर एक वेळ अशी येईल की सारे मृत पुन्हा एकदा ईश्वरासमोर एकत्र केले जातील व त्यांच्या ऐहिक जीवनातील कर्मानुसार मोबदला दिला जाईल. तो दिवस अत्यंत महत्वपूर्ण असेल. त्या दिवशी आमच्याबाबत अंतिम निर्णय घेण्यात येईल. एक तर आम्हांस सदासर्वदा करिता सुख-शांति व ईश्वरीय वरदान प्राप्त होईल अथवा अनंतकालीन दु:ख

व यातना व ईश्वरीय कोप सहन करावा लागेल. या अत्यंत भयानक व महत्वाच्या दिवसाबाबत प्रत्येक प्रेषिताने सूचना दिली आहे व सर्वांना त्या दिवशी सफल होण्याचा मार्ग ही दाखविला आहे. प्रत्येकास अनंतकालीन सुखाची कामना असणे स्वाभाविक आहे. या कामनेची पूर्ति करण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे प्रेषितांच्या सूचनांवर विश्वास करुन व त्यांच्या सूचनांनुसार जीवन व्यतीत करण्याचे प्रयत्न करावे.

सत्यधर्माचे एक वैशिष्ट असे की त्याने मानवांना एक दुसऱ्याचे शुभचिंतक, सहयोगी व बंधु मानले आहे. आपापसातील भेद-भाव, वैमनस्य व घृणे ऐवजी प्रेम, सहानुभूति व बंधुत्वाची शिकवण दिली आहे. लोकांना जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात न्याय, सत्य व ईश्वरीय आदेशांचे पालन करण्याची शिकवण दिली आहे.

प्रेषित मुहम्मद (स.) ने धर्माच्या याच संकल्पनेला लोकांसमोर मांडले जी त्यांच्या अगोदरच्या प्रेषित व संदेशवाहकांनी प्रस्तुत केली होती. प्रेषित मुहम्मद (स.) नी ज्या धर्मांची शिकवण दिली, त्याला नवा धर्म मानता येणार नाही तसेच ते केवळ एका ठराविक जनसमूहाचे पथदर्शक होते असे म्हणणे ही योग्य होणार नाही. ते संपूर्ण जगाला सत्याचा मार्ग दाखविण्यासाठी आले होते. आपण दिलेली शिकवण संपूर्ण मानव समाजासाठी असून या पुढे ईश्वराचा दुसरा कोणताच प्रेषित जगात मानवाच्या पथप्रदर्शनासाठी येणार नाही. त्यांच्या द्वारे ईश्वराने सत्य धर्माला परिपूर्ण करुन सुरक्षित करुन टाकले आहे. ज्याने त्यांचा इन्कार केला, त्याने सर्व प्रेषितांचा व सत्य धर्माचा इन्कार केल्यासारखा आहे. त्यांच्यावर विश्वास असणे म्हणजे पूर्वी आलेल्या सर्व प्रेषितांवर श्रद्धा व सम्मान केल्यासारखे आहे. मग ते प्रेषित कोणत्याही देशात जन्मले असोत व कोणतीही भाषा बोलणारे असोत.

# धर्मनिरपेक्षता

**(सुरेंद्रसिंह कादियान)**

कुरआनात धार्मिक स्थळांवर आक्रमण करण्याबाबत निषेध करण्यात आला आहे. धर्मप्रचारासाठी सहिष्णुता व प्रेम यांना अनिवार्य मानले गेले आहे. अन्य धर्माच्या मान्यवर व्यक्तीची रक्षा करण्याचे आदेश देण्यात आले आहे. धार्मिक स्थळांना उध्वस्त करणाऱ्या काफिरांबाबत कुरआनात म्हटले आहे.

**आणि त्या व्यक्तिपेक्षा अधिक अत्याचारी कोण असेल जो अल्लाहच्या प्रार्थनास्थळांमध्ये त्याचे नामस्मरण करण्यास प्रतिबंध करतो. आणि त्या स्थळांना उध्वस्त करण्याचा प्रयत्न करतो ? असे लोक त्या प्रार्थनागृहामध्ये पाय ठेवण्यासही पात्र नाहीत आणि जर कधी गेले तर त्यांनी भीतभीतच जावे. त्यांचा ह्या नश्वर जीवनामध्येही धिक्कार आहे आणि मरणोत्तर जीवनामध्येही त्यांना यातना भोगाव्या लागतील.** *(कुरआन २:११४)*

इस्लामी इतिहासात एका घटनेचा उल्लेख आहे ज्यात एका विशेष अपराध्यास कठोर शिक्षा देण्यात आली होती. अलमुअतसि यांच्या (ई. सन ८३३ ते ८४२) काळात एका मुसलमानाने एका इमाम व एका मुअज्जन (बांग देणारा) ला चाबकाचे फटके मारले होते कारण त्या दोघांनी अग्निपूजकांच्या प्रार्थनास्थळास उध्वस्त करुन त्या ठिकाणी मशीद उभारली होती.

इस्लामविषयी पूर्वग्रह दूषित मानसिकतेच्या विरोधकांना हे जाणून आश्चर्य होईल की कुरआनात इतरांवर आपला धर्म बळजबरी लादण्याची शिकवण देण्यात आलेली नाही. धर्मप्रचार करताना कोणावर बळजबरी करण्यात येऊ नये. कुरआनात प्रेषित मुहम्मद (स.) यांना उद्देशून म्हटले आहे.

जर तुझ्या पालनकर्त्याची इच्छा अशी असती की पृथ्वीतलावर (सर्वांनी श्रद्धावंत व आज्ञाधारकच व्हावे) तर सर्व भूतलवासियांनी श्रद्धा ठेवली असती, मग तू लोकांना भाग पाडशील का की त्यांनी श्रद्धावंत व्हावे ? *(कुरआन १०:९९)*

धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती होता कामा नये. *(कुरआन २:२५६)*

तो आपल्या देणग्यांची परिपूर्णता करतो की तुम्ही त्याचे आज्ञाधारक व्हावे. जर हे लोक विमुख होत असतील तर हे प्रेषिता (स.) तुमच्यावर सत्याचा संदेश स्पष्टपणे पोहचविण्याखेरीज इतर कोणतीच जबाबदारी नाही. *(कुरआन १६:८२)*

जो अल्लाहवर श्रद्धा ठेवत असेल, अल्लाह त्याच्या हृदयाला मार्गदर्शन करतो. अल्लाहला प्रत्येक वस्तूचे ज्ञान आहे. अल्लाहची आज्ञा पाळा आणि प्रेषित (स.) ची आज्ञा पाळा. परंतु जर तुम्ही आज्ञापालनापासून तोंड फिरवीत असाल तर आमच्या प्रेषितावर (धर्माचे) सत्य स्पष्टपणे पोहचविण्याशिवाय कोणतीही जबाबदारी नाही. अल्लाहशिवाय दूसरा कोणी आराध्य नाही. म्हणून श्रद्धावंतानी अल्लाहवरच भिस्त ठेवायला हवी. *(कुरआन ६४:११-१३)*

कुरआनाने ज्ञान अर्जित करीत राहण्याचे आवाहन केले आहे मग ते कोणत्याही मार्गाने प्राप्त होवो. कुरआनने अन्य धार्मिक ग्रंथाचा आदर केला आहे. कारण त्या सर्वांमधून ज्ञानाचा प्रकाश प्राप्त होतो. जे एका धर्माचे लोक दुसऱ्या धर्माच्या ग्रंथाबाबत आक्षेप घेतात त्याबाबत कुरआन निषेध करतो.

आणि यहूदी लोकांनी म्हटले की ख्रिस्ती धर्मात काही अर्थ नाही. त्याचप्रमाणे ख्रिस्ती म्हणाले की यहुदी लोकांकडे काहीच विशेष नाही. खरे पाहता दोन्ही ईश्वरीय ग्रंथाचे पठण करतात व दोघांच्या धर्मांचे मूळ स्रोत

एकच आहे. धर्मग्रंथाचे ज्ञान प्राप्त केलेले काही लोक अशाच प्रकारे बोलत असतात (अर्थात् प्राचीन धर्माचरण करणारे अरब लोक व ख्रिस्ती धर्मीय मोक्षावर त्यांचा पैतृक अधिकार असल्याचा दावा करीत) ठीक आहे न्यायाच्या अंतिम दिवशी यांच्या भाडणाचा ईश्वरच न्याय करील (व त्याच वेळी सत्य प्रगट होईल)

कुरआनची ही मुलभूत विशेषत: आहे की त्याने धार्मिक ग्रंथाची व प्रेषितांची उपेक्षा वा निंदानालस्ती केलेली नाही व धार्मिक सहिष्णुतेचे जिवंत उदाहरण आहे.

**हे प्रेषित (स.), आम्ही तुमच्याकडे त्याचप्रकारे दिव्य प्रकटन (वही) पाठविली आहे, ज्या प्रकारे नूह (अ.) आणि त्यानंतरच्या प्रेषितांकडे पाठविले होते. आम्ही इब्राहीम (अ.), इस्माईल (अ.), इस्हाक (अ.), याकूब (अ.) आणि याकूबची संतान ईसा (अ.) अय्यूब (अ.) युनूस (अ.), हारुन (अ.) आणि सुलेमान (अ.) कडे दिव्य प्रकटन पाठविले. आम्ही दाऊद (अ.) यांना जबूर दिला. आम्ही त्या प्रेषितांवर देखील दिव्य प्रकटन अवतरित केले ज्यांचा उल्लेख आम्ही या पूर्वी केला आहे आणि त्या प्रेषितांवर देखील ज्यांचा उल्लेख तुमच्या जवळ केला नाही.** *(कुरआन ४:१६३)*

**आम्ही कांही अन्य लोकांना हा कृपाप्रसाद सुपुर्द केला आहे जे त्याला नाकारीत नाहीत. हे प्रेषित (स.) अल्लाह कडून मार्गदर्शन प्राप्त झाले ते तेच लोक होते, त्यांच्याच मार्गावर तुम्ही चला.** *(कुरआन ६:९०)*

कुरआनने जो आदेश दिला आहे त्यात कुरआनची मूळ भावना स्पष्ट होते.

**आम्ही तुम्हा (मानवा) पैकी प्रत्येकासाठी एकच शरियत**

(जीवनाचा कायदा) व एकच कार्यप्रणाली निश्चित केली आहे. जर तुमच्या ईश्वराने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना एकच लोकसमूह (उम्मत) बनविले असते. हे सर्व तुमची परीक्षा घेण्यासठी केले आहे. म्हणून चांगुलपणात एक दुसऱ्यापेक्षा सरस ठरण्याचे प्रयत्न करा. शेवटी तुम्हा सर्वांना अल्लाहकडेच परत जावयाचे आहे. मग तो तुम्हाला सत्यस्थिती दाखवून देईल. *(कुरआन ५:४८)*

कोणीतरी मुहम्मद (स.) यांना म्हटले "अनेकेश्वरवादाविरुद्ध अल्लाहकडे प्रार्थना करुन त्यांना शाप द्या" प्रेषित उत्तरले "मला जगात दयावान म्हणून पाठविण्यात आले आहे, शाप देण्यासाठी नाही ! *(मुस्लिम)*

एक प्रेतयात्रा जवळून जात होती. प्रेषित मुहम्मद (स.) उठून उभे राहिले. कोणीतरी म्हटले ही तर यहूदी माणसाची प्रेतयात्रा आहे प्रेषितांचे उद्गार होते "यहूदी माणूस नसतात काय ? *(मुस्लिम)*

आदेश देण्यात आला होता की, यहूदी वा ख्रिस्ती आईच्या मुसलमान मुलाने आपल्या आईला खच्चरावर बसवून चर्चपर्यंत सोडून यावे, जर गरीबीमुळे खच्चर उपलब्ध नसेल किंवा म्हातारी आई खच्चरावर बसू शकत नसेल तर मुलाचे कर्तव्य आहे की त्यांने आईला खांद्यावर बसवून चर्चपर्यंत घेऊन जावे.

उपरोक्त उदाहरणाद्वारे इस्लाम धर्माच्या निरपेक्षतेचे समर्थन करण्याचे प्रयत्न करण्यात आले आहे. कुरआनच्या प्रभावामुळेच अरब समाजाला धार्मिक सहिष्णुतेच्या तत्वाआधारे प्रेम व एकतेच्या सूत्रात बांधून टाकले होते. कुरआनच्या दृष्टिकोनाचा मुस्लिम व मुस्लिमेतरांनी पूर्वग्रहांपासून मुक्त होऊन शांतपणे विचार करायला हवा. ह्याच मार्गाने धार्मिक तेढ संपुष्टात येऊ शकते.

# बुद्धिसंगत धर्म

**(वी.गोर्डविन चाईल्ड)**

बरेच लोक इस्लामला केवळ धर्म समजतात. फार कमी लोक इस्लामला एका आंदोलनाच्या स्वरुपात पाहतात. थोडक्यात सांगायचे झाल्यास इस्लाम हा जगातल्या सर्व धर्मापेक्षा वेगळा धर्म आहे. इस्लाम एक इतिहासही आहे व ते एक प्रबल आंदोलनही आहे. त्यात राजकारण ही आहे व सामाजिकताही आहे.

इस्लाम मनोविज्ञानाचे पहिले पुस्तक आहे व अध्यात्माचा अंतिम ग्रंथ आहे. इस्लाम असा धर्म आहे व जगाला मिळालेली अशी संधी आहे की जो खऱ्या अर्थाने जगातील सर्व धर्मांना अपेक्षारहित सिद्ध करतो. कुरआनचे अध्ययन केल्यानंतर मनात विश्वास निर्माण होतो की त्याचा रचयिता (लेखक) जो कोणी असेल कितीतरी युगाचा महान रचयिता असला पाहिजे. कुरआनच्या रचयितेने या गोष्टीकडे बारकाईने नजर ठेवली आहे की कोणतीही बाब प्रमाणरहित नाही. कुरआनने पुन्हा पुन्हा बुद्धिवर विश्वास करण्याचे आवाहन केले आहे. बुद्धिचा उपयोग न करणाऱ्याची पशुशी तुलना केली आहे. कुरआन बुद्धिलाच खरी कसोटी मानतो. कुरआनने अंधविश्वासापासून अलिप्त राहण्याचा आटोकोट प्रयत्न केला आहे व व्यर्थ गोष्टींचा नाममात्र ही शिरकाव होऊ दिलेला नाही. कुरआनच्या विचारशैलीशी त्या तत्वज्ञानाशी तुलना करता येईल जो केवळ विश्वाचा विचार करतो व त्यातूनच निष्कर्ष काढतो. कुरआनची ही विशेषता माणसाला आश्चर्यचकित करुन सोडते व हळूहळू आपल्याकडे आकर्षित करु लागते व शेवटी पूर्णतः तो पूर्णपणे वशीभूत होतो.

इतिहासकारांनी अरबस्थानच्या असभ्य लोकांनी बगदाद व स्पेन येथे ज्ञान व कलेचा पाया रोवला, ही बाब अत्यंत अनिच्छापूर्वक स्वीकारली

आहे. अरबांचे ज्ञान व समजून सांगण्याच्या पद्धतीने ते आश्चर्यचकित झाल्याशिवाय राहू शकले नाही. त्यांनी या गोष्टीकडे लक्ष दिले नाही की लोकांवर छाप टाकण्याची प्रेरणा त्यांना कुठून प्राप्त झाली. लोकांनी या संदर्भात वेगवेगळ्या कल्पना व्यक्त केल्या. कांहीनी त्यास केवळ योगायोग मानले. काहींचे म्हणने होते की ग्रीक विद्यालयाकडून त्यांना प्रेरणा प्राप्त झाली असावी. युनानी विद्यांकडे त्याच लोकांचा कल असतो ज्यांनी बौद्धिक ज्ञानाचा आस्वाद घेतला असेल.

इतिहासकार कुरआनशी परिचित असते तर त्यांनीवरील बिनबुडाच्या गोष्टी केल्या नसत्या. कुरआन बुद्धिचा समर्थक आहे. हे एकदम स्पष्ट आहे की ज्या समाजाचा धर्म बौद्धिक व प्रामाणिक असेल तर तो विज्ञान व समाजासंबंधी ज्ञानाचा विरोधी होऊ शकत नाही. उलट धार्मिक दृष्टिने विज्ञानाची पाठराखण करणे त्याचे कर्तव्य असेल. कुरआन बुद्धिच्या उपयोगितेचा समर्थक नसता तर मुसलमान ही ज्ञानाचा चाहता झाला नसता व स्पेनच्या मार्गाने युरोपात विज्ञानाची ज्योत प्रकाशित झाली नसती.

आमच्या सभ्य जगात कलेला महत्व प्राप्त आहे व तो तर आमच्या चरित्राचा एक भाग आहे. मात्र जगाला हे जाणून आश्चर्य होईल की कुरआनात कलेला स्थान नाही. ज्या लोकांनी सौदर्यवादास प्राधान्य दिले आहे व ज्यांना कलेस उन्नति दिल्याचा अभिमान आहे, त्यांना इस्लामकडून निराशा होईल कारण त्यात त्यांच्या रुचिची कोणतीच बाब नाही. मात्र धन्य आहे कुरआनचा रचयिता की त्याने चरित्र व आचरणाच्या त्या सर्व दुष्परिणामांना आव्हान दिले आहे जे कलेच्या नांवाने आमच्या समाजाला पथभ्रष्ट करीत आहे. या गोष्टीचे सत्य दीर्घकाळानंतर कलेच्या दुष्परिणामाच्या स्वरुपात जीवनाच्या पृष्ठभूमिवर प्रगट होईल व आमच्या नव्या पीढीला आतून पोखरुन टाकील.

आर्ट (कला) म्हणजे आहे तरी काय ? आर्टचा अर्थ आहे पथभ्रष्टता, नैतिक पतन, मानसिक अशांति, यौन स्वच्छंदता, भोग विलासाची निरंकुशता व आपल्या गत जीवनाच्या चुका लपविण्याचा एक मार्ग !

कुरआनने मूर्तिपूजेचा निषेध करुन कलेचे निम्मे भवन उध्वस्त करुन टाकले आहे. कारण कलेचा फार मोठा भाग प्राचीन काळाच्या मूर्ति व चित्रांचे लज्जास्पद स्मरण होय व यौनसंबंधी संपर्कांचे स्मारक होय ज्यावर सौंदर्यवादाचे आवरण आच्छादित करण्यात आले आहे.

कुरआन दिव्य सौंदर्याचा दर्पण आहे मात्र अश्लीलतेचा पुरस्कर्ता नव्हे.

हल्ली आर्ट व मधुर कलेचा खूप गवगवा आहे. मात्र लवकरच कलेच्या दुष्परिणामांचे चित्र व सत्य हानिकारक स्वरुपात समोर येईल.

**(आजही आपण कलेच्या दुष्परिणामांचा अनुभव घेऊ लागलो आहोत - सम्पादक)**

कुरआनने ज्या अनिवार्य कर्मांवर प्रकाश टाकला आहे. त्यांना वाचून विश्वास होतो की त्या रचनाकाराने धर्म व भौतिक जीवनाचे सरस मिश्रण तयार केले आहे. नमाज दिवसातून पाच वेळा अदा केली जाते. नमाज जीवनाची एक निरंतर गति आहे. तिच्याद्वारे एका अशा शक्तीशी संबंध स्थापित केला जातो, जिला आम्ही कधी पाहिलेले नाही व त्याच संबंधाच्या आधारे जगाच्या स्थितिनुसार जीवन व्यतीत करणे हा नमाजचा मुख्य उद्देश्य आहे. यापेक्षा उत्तम ईश-उपासनेचा दूसरा कुठलाच मार्ग दिसून येत नाही.

कुरआनने राजकारणात कोणतीच अक्षमता प्रगट केलेली नाही. राजकारणात तेच बल व आवश्यक प्रभाव प्रगट करण्यात आले आहे जे स्वाभाविकपणे गरजेचे आहे. सर्वात महत्वाची बाब आहे की कुरआनने खिलाफत, ईशभय, जनसेवा व मरणोपरांत जीवनाबाबतच्या कल्पनेला

राजकारणाशी वेगळे केले नाही. आज मात्र याच्या विपरित परिस्थिती दिसून येते व याच कारणामुळे जगाला दोन महायुद्धाला सामोरे जावे लागले. मी तर म्हणेन की जर युरोपने ईश-कल्पना व नैतिक मूल्यांचा आधार न घेता सुरक्षेसंबंधी कोणतेही करार व उपाय योजण्याचे प्रयत्न केल्यास ते निश्चितच फोल ठरतील. विश्वशांतीसाठी अनेक उपाय योजिले गेले आहेत. धर्माच्या आधारावर ही उपाययोजना का करुन नये व जर कोणी याबाबतीत तयारी दर्शवीत असेल तर त्याने कुरआनकडे मुळीच दुर्लक्ष करु नये असा मी सल्ला देऊ इच्छितो. कारण या संबंधात कुरआनइतके चांगले मार्गदर्शन कोणत्याच ग्रंथाद्वारे प्राप्त होऊच शकत नाही. सखेद सांगावे लागते की आतापर्यंत कोणीच इस्लामची आदर्श राज्यव्यवस्था स्थापन करण्याचे प्रयत्न केले नाही. इजिप्त, तुर्कस्थान, इराण, अफगनिस्तान इत्यादि मुस्लिम राष्ट्रांना तेराशे वर्षापूर्वीच्या हजरत उमर (रजि.) कालीन शासनव्यवस्थेशी काहीही घेणे-देणे नाही. कुरआनी राज्यव्यवस्था व मुस्लिम शासन व्यवस्थेमधले अंतर जाणून न घेतल्यामुळे अनेक गैरसमज निर्माण होतात. राजनैतिक बल युरोपसाठी विनाशकारी सिद्ध झाला आहे. अशा शक्तिपेक्षा ती दुर्बलता स्तुत्य आहे जी हिरोशिमा नागासाकीच्या विनाशावर दुःख व्यक्त करते व शक्तिविरुद्ध आपला रोष प्रदर्शित करते.

# वैदिक धर्म व इस्लाम

(एस.एम.शरीफ कुरैशी दिल्ली)

मानवाकरिता धर्म स्वाभाविक आवश्यकता आहे. हे ईश्वराकडून पाठविलेले मानवतावादी तत्व आहे ज्यांच्याद्वारे मानवी चारित्र्याचा उत्कर्ष घडून येतो, आत्म्यास पावित्र्य व हृदयास शांति प्राप्त होते. अशा प्रकारे एका श्रेष्ठ संस्कृतिचा पाया रोवला जातो. धर्माच्या तत्वांनुसार जीवन व्यतीत करणे हाच मोक्षाचा मार्ग आहे.

दीन (परिपूर्ण जीवन पध्दती) चा अवलंब करण्यासाठी ईश्वराच्या अस्तित्वावर व त्याच्या शक्तीवर श्रद्धा करणे मुलभूत गरज आहे. कुरआनात म्हटले आहे.

**सर्व प्रकारची स्तुति अल्लाह करिताच आहे जो संपूर्ण सृष्टीचा पालनकर्ता आहे.** *(कुरआन सू.फातेहा २-१ ते ३)*

**तुम्हाला माहित नाही का की पृथ्वी व आकाशामध्ये अल्लाहचेच अधिपत्य आहे आणि त्याच्याशिवाय अन्य कुणीही तुमची काळजी घेणारा व मदत करणारा नाही?** *(कुरआन २:१०६-१०७)*

ऋग्वेदात सांगितले आहे :

**मही देवस्य सवितु : परिद्धति**

"अर्थात जग रचणाऱ्या करिता स्तुति आहे." (ऋ ५-७१.१)

**महोदिवा : पृथिव्याश्च सम्राट**

**अर्थात् तो महान धरती आकाशाचा स्वामी आहे.**

**अनश्नन्नन्यो अभिचाक 'शीत'** *(ऋ १-१००-१)*

**अर्थात् परमेश्वर खात नाही, दुसऱ्यांच्या खाण्यापिण्याचा प्रबंध करणारा आहे.** **(ऋग्वेद १-१६४-२०)**

अल्लाहवर श्रद्धा असणे म्हणजे मनुष्याला त्याच्याकडून मार्गदर्शन प्राप्त होते हे सत्य स्वीकारणे होय.

अल्लाहचे कथन आहे,

**हे पवित्र ग्रंथ आम्ही अवतरित केले आहे जेणेकरुन त्यावर तुम्ही अवलंब करुन स्वतःला दुष्कर्मापासून दूर करावे व दयेस पात्र व्हावे.** (कुरआन सू.अनआन)

असेच ऋग्वेदात ही म्हटले आहे. 'नवाउ सीमोवृचिन हिनीस'

**अर्थात् परमात्मा कधी कुकर्माकडे नेत नाही.** (ऋ.७-१०४-१३)

म्हणूनच मानवांपर्यंत संदेश पोहोचविण्याचे कार्य मानवांनाच (प्रेषितांनाच) सोपविण्यात आले आहे. पवित्र कुरआननुसार विभिन्न युगात विभिन्न देशात प्रेषितांचे आगमन होत राहिले. ज्याच्या त्याच्या काळाच्या परिस्थितिनुसार अल्लाहचे आदेश प्रेषित मानव समाजापर्यंत पोहचवीत राहिले. कुरआनात अल्लाहचे कथन आहे.

**जगात असा कोणताच जनसमूह नाही ज्याच्या करिता (अल्लाहने) मार्गदर्शक (प्रेषित) पाठविला नाही.** *(कुरआन ३५:३)*

**मला इस्त्राईलच्या बहकलेल्या मेंढ्याशिवाय इतरांकरिता पाठविले गेलेले नाही.** *(मती १४:१५)*

वैदिक धर्म आरंभी एक साधा व ईश्वराची आराधनेची शिकवण देणारा धर्म होता.

कुरआनात अल्लाहचा फरमान आहे,

**आम्ही जितके प्रेषित पाठविले ते त्या त्या जातिच्या भाषा बोलणारे होते.** *(कुरआन सूरह इब्राहीम १४-४)*

**एक सद्विप्रा वहुधावदन्ति**

**अर्थात ईश्वर एक आहे. लोक त्याला विभिन्न नांवाने हाक देतात.** *(ऋ.१-१६४-४६)*

दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे.

**ऋतावान ऋतजाता ऋतावृधो**

**धीरासो अनृतद्विषः ।**

**तषाव सुमने सुच्छदिष्टये नरः**
**स्याम ये च सुरयः ॥** ऋ. ७-३३-१३

अर्थात् जी चांगली माणसे आहेत, ते सदाचार व सत्याचा मार्ग अवलंबतात व ओळखले जातात की ते असत्याचे विरोधी आहेत. आमच्यात जितके लोक समंजस आहेत अशा सर्वांनी त्या लोकांच्या सहवासात जीवन व्यतीत करावे.

कुरआनात म्हटले आहे.

**वस्तुतः तुम्हा लोकांसाठी अल्लाहचे प्रेषित एक उत्कृष्ट आदर्श आहे.** *(कुरआन सूरह अहजान ३३:३१)*

**हे मुहम्मद (स.) सांगा की मानवांनो', मी तुमच्या ईश्वराचा प्रेषित आहे. त्या ईश्वराचा जो आकाश व पृथ्वीचा मालक आहे. ज्याच्या व्यतिरिक्त कोणीही आराध्य नाही. तोच मारणारा व जीवित करणारा आहे. श्रद्धा बाळगा, ईश्वरावर व त्याच्या प्रेषितावर (जो निरक्षर आहे), जो ईश्वरावर व त्याच्या आज्ञांवर श्रद्धा ठेवतो, त्याचे अनुसरण करा. आशा आहे की तुम्ही सुमार्गी व्हाल.** *(कुरआन)*

इस्लाम तथा वैदिक धर्मात मुलभूत धारणा (तत्व) (एकेश्वरवाद, प्रेषितवाद-परलोकवाद) व आचरणा संबंधीच्या शिकवणीत साम्य आहे. 'इस्लाम' चा अर्थ आहे आज्ञापालन अर्थात् ईश्वरीय आदेशांचे पालन करणे व 'मुस्लिम' चा अर्थ आहे आज्ञापालक. 'इस्लाम' हा नवीन धर्म नाही. उलट ही तर तीच वास्तविकता आहे जी नेहमीच मानवाजवळ होती. अथर्व वेदात म्हटलंय :

**स एष. एकवृदेकएव** *(अथर्व १३-४-२०)*

अर्थात् - 'तो परमेश्वर एकच आहे व त्याचे विधान ही एकच आहे'

लोकांनी आपल्या निष्काळजीपणाने सत्यधर्माचे नुकसान केले आहे. त्यात बदल घडवून आणला. याचकरिता इश्वराने अन्तिम प्रेषिताद्वारे पुन्हा एकदा सुधारित व परिपूर्ण स्वरुपात ते आमच्याकडे पाठविले आहे. इस्लाम धार्मिक उत्कर्षाचे उच्चतम बिंदू आहे. कुरआनात अल्लाहने म्हटले आहे.

**आज या दिवशी मी तुमचा धर्म तुमच्याकरिता परिपूर्ण केला.**
*(कुरआन अल्मायदा ५:४)*

**इष्टारुप व्याकरोत सत्यानृते प्रालापतिः**
**अश्रामनृते दधाच छद्धांसत्य प्रजापतिः** *(यजु १९-७७)*

अर्थात् - ईश्वराने सत्य व असत्याच्या स्थितीस पारखून सत्यास असत्यापासून विभक्त करुन आदेश दिलेत की लोकहो, सत्यावर श्रद्धा ठेवा व असत्यापासून अलिप्त रहा.

**ऋवतभ्य यथा नमसा विनोसेत** (ऋ. १०-३१-२)

अर्थात् - मनुष्याचे कर्तव्य आहे त्याने सत्याचा मार्ग अवलंबवावा.''

इस्लाम सत्य धर्म आहे. त्याचे कार्यक्षेत्र केवळ आराधना व पूजापाठापर्यंत सीमित नाही. इस्लाम म्हणजे पूर्ण जीवन व्यवस्था व दैनिक जीवनाचा धर्म आहे. इस्लाम अध्यात्मिक, सामाजिक, राजनैतिक, सांस्कृतिक, व्यावहारिक म्हणजेच जीवनाच्या सर्वच क्षेत्रात निरुपम व आचरणायोग्य मार्गदर्शक तत्वांची शिकवण देतो. मात्र त्या सर्वांचे आधार मूलतत्व तौहीद (एकेश्वरवाद) 'रिसालत' (प्रेषितवाद) व आखिरत (परलोकवाद -मरणोपरांत जीवन) वरील श्रद्धा आहे.

एकेश्वरवादावर श्रद्धा इस्लामी जीवनाचा केंद्रबिंदू आहे. ईश्वराचे प्रेषित व ऋषींनी या गोष्टीकडे विशेष लक्ष आकर्षित केले आहे व त्याबाबत उपदेश ही दिला आहे.

''ला इलाहा इल्लल्लाह'' अल्लाह व्यतिरिक्त कोणीच ईश्वर नाही.'' (अर्थात् अल्लाह एक आहे व तोच आराधने योग्य आहे).

कुरआनात म्हटले आहे.

**खुदा एक आहे.** *(कुरआन ११२-१)*

वेद म्हणतो

**य एक दूत । तमुष्टति ।** *(ऋ. ६-४५-१६)*

अर्थात् - तो एकमेव आहे, त्याची उपासना करा.

कुरआनचा आदेश आहे :

**अल्लाहशिवाय अन्य कुणाचीच भक्ति करु नका.**

*(कुरआन २:८३)*

वेदाची आज्ञा आहे :

**मा चिदन्य यश:** **(यजु ३६-३)**

अर्थात : त्या परमेश्वराची मूर्ति तयार करता येत नाही. त्याची महानता अत्यंत मोठी आहे.''

या धारणेची अपेक्षा अशी आहे की ईश्वर जो जगाचा मालक आहे, पालनकर्ता आहे, त्याच्याच आज्ञेचे पालन करायला हवे. कोणत्याच माणसाला दुसऱ्या माणसावर प्राधान्य प्राप्त नसावे. प्रधानता, आदर व प्रतिष्ठेचा एकच मापदंड आहे व तो म्हणजे ईश्वराचे कृतज्ञ बनून राहावे त्याचेच आज्ञाधारक राहावे. ईशभय बाळगून त्याच्या प्रसन्नतेसाठी केलेले कर्म ज्या माणसाच्या आचरणात असतील तोच प्रतिष्ठित मानला जाईल. जात, वर्ण, वंश, देश इत्यादि गोष्टीमुळे माणसात फरक करण्यात येऊ नये, कारण त्या सर्वांचा सृजनकर्ता एकच आहे.

कुरआनात अल्लाहचे कथन आहे.

**निश्चितच, जे लोक सदाचारी आहेत व सत्कर्मी आहेत ईश्वर त्यांचा सहाय्यक आहे.** *(कुरआन सू.नम्ल)*

वेदात म्हटलंय :

**प्रिय : सुकृत प्रिय: इंद्र मनायु:**

अर्थात् - ईश्वराला सुकर्मी व विचारी माणसे जवळची वाटतात.

ईश्वर सृष्टीचा रचनाकार / सृजनकर्ता आहे व तोच मालक आहे व त्यानेच ईशदूता (प्रेषितां) मार्फत मानवी जीवनाकरिता आदेश पाठविले आहेत. हे सत्य स्वीकारल्यानंतर मनांत निश्चितपणे एक विचार निर्माण होतो की ईश्वराच्या आदेशानुसार जीवन व्यतीत करणाऱ्या व तसेच न करण्याऱ्याकडून एक दिवशी जाब विचारला जाईल. तोच दिवस 'यौमे दीन' अर्थात कयामतचा दिवस असेल. वैदिक धर्मात यास 'महाप्रलय' म्हटले गेलंय. वैदिक धर्माचे प्रकांड पंडित विनोबा भावे यांनी आपल्या ''गीता प्रवचन'' या पुस्तकात लिहिले आहे,

"तुम्ही किती ही संतति निर्माण केली तरी शेवटी एक दिवस असा येईल की संपूर्ण भूतलावरुन संपूर्ण मानवजातीचा नायनाट होईल. वैज्ञानिक व विद्वानाचे म्हणणे आहे की पृथ्वी हळूहळू थंड होत चालली आहे. एक काळ असा होता की पृथ्वी अति उष्ण होती. त्या काळात पृथ्वीवर सजीव प्राणी नव्हते. अर्थात् सजीवांनी जन्मच घेतला नव्हता. आता असा एक काळ येणार आहे की पृथ्वी एकदम थंडावली जाणार आहे व सर्व सजीव प्राणहीन होतील. कदाचित या प्रक्रियेस लाखो वर्ष लागतील. कितीही लोकसंख्या वाढली तरी शेवटी प्रलय येणारच"

- ('गीता प्रवचन' अनुवाद - ख्वाजा जकरिया अब्बासी पृ.२७७)

काही झाले तरी शेवटी सृष्टीचा विनाश अटळ आहे ईश्वर सृष्टीचा विनाश करुन पुनर्रचना करुन जीवन प्रदान करील. न्यायनिवाडा करुन लोकांच्या श्रद्धा व कर्मांची तपासणी करील. ईश्वराच्या कृपेसह मोक्ष (नजात) या दोन गोष्टींवर अवलंबून आहे.

जीवनाबाबत जी कल्पना प्रस्तुत करण्यात आली आहे ती दोन भागात विभागली गेली आहे. अर्थात् वर्तमान जीवन व अनंतकालीन (मरणोपरांत) जीवन. वर्तमान जीवन हे आगामी (पारलौकिक) जीवनाच्या तयारीचा काळ आहे. आज आम्ही जे काही करु त्याचे सुपरिणाम वा दुष्परिणाम आगामी (पारलौकिक) जीवनात प्राप्त होतील. कुरआनात उल्लेख आहे की..

**तेंव्हा ज्या लोकांनी श्रद्धा ठेवून सदाचरणाचा अवलंब केला ते आपला पुरेपूर मोबदला प्राप्त करतील आणि अल्लाह आपल्या कृपेने त्यांना जादा मोबदला प्रदान करील आणि लोकांनी भक्तिला अनावश्यक मानले व गर्वाने वागले त्यांना अल्लाह यातनादायक शिक्षा देईल.** *(कुरआन ४:१७३)*

कुरआनच्या सूरह इम्रानमध्ये म्हटले आहे.

**अल्लाह श्रद्धावंताचे सत्कर्म वाया घालवीत नाही.**

*(कुरआन ३:१७१)*

वेदात म्हटले आहे.

**स्वयं यजस्व स्वयं जुसस्व** *(यजु २३-१५)*

अर्थात्- "तू कर्म कर, तूच त्याचे फळ भोग!"

**यदङग दाशुषे त्वमग्ने करिष्यसि तवेत तत सत्यमाङगर ।**

*(ऋ १-१.६)*

अर्थात्-हे परमेश्वर तू सत्कर्म करणाऱ्यास चांगली फळे देतोस, हे तुझे विशेष गुण आहे."

या श्रद्धेने मनुष्याला आगामी जीवनात साफल्य प्राप्त करण्याची इच्छा जागृत होते व ऐहिक सुखेच्छा, जी सर्व दुष्कर्मांची जननी आहे, ती कमकुवत होते. याचे कारण असे की महाप्रलया (कयामत) च्या दिवशी मनुष्याच्या कर्मानुसार (मोबदला) सुख वा शिक्षा भोगण्यासाठी स्वर्ग वा नरकात अनन्तकालासाठी पाठवून देण्यात येईल. अल्लाहवर श्रद्धा ठेवणाऱ्या व सत्कर्म करणाऱ्यांसाठी स्वर्ग आहे. स्वर्गाची प्राप्ति म्हणजे अल्लाहची प्रसन्नता होय. सर्वोत्तम सुख व सुविधां ज्यांची मनुष्य कामना करतो ती सर्व स्वर्गात उपलब्ध असतील.

कुरआनांत श्रद्धावंताकरिता संदेश आहे की,

**अशा लोकांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ असा आहे की तो त्यांना माफ करील व अशा नंदनवनात त्यांना दाखल करील ज्याच्या खाली कालवे वाहत असतील आणि तेथे ते सदैव राहतील. किती छान मोबदला आहे सत्कृत्य करणाऱ्यांसाठी!** *(कुरआन ३-१३६)*

वेदात ही असेच म्हटले आहे.

**यत्र ज्योतिरजस्त्र यास्मल्लोके स्वर्हितम ।**

**तस्मिन्या घहि परमाना मृते लोके अक्षित इंद्रायेन्दो परित्रष।**

अर्थात्-जिथे निरंतर प्रकाश आहे, जिथे मुक्त वातावरण आहे। हे पवित्र कर्ता मला मुक्तिच्या निर्दोष लोकांत ठेव. माझ्या आत्म्यावर सर्व बाजूने सृष्टीच्या भांडारातून आनंदाचा वर्षाव कर।"

दूसरे कथन आहे.

**यत्रानन्द मादश्चपुद आसते**
**कामस्य यत्राप्ताः कामास्तत्र** (ऋ ९-११३)

अर्थात्-''जेथे आनंद आहे, चव आहे, चविष्ट पदार्थ आहेत, उत्तम लालित्य आहे, जिथे सुहृदयांची कामना सुरवातीपासूनच उपलब्ध आहेत, त्या लोकांत मला (मोक्ष) स्थान दे। हे प्रकाशमान अनन्य स्त्रोत (ईश्वरा), या आत्म्यावर सर्व बाजूने प्रकाशाचा वर्षाव कर।''

भगवद् गीतेत म्हटले आहे

**कर्मज बुद्धियुक्ताहिफल त्यक्त्वा मनीषिण।**
**जन्म बंध विनिर्मुक्ताः पदं गछन्त्यानामयम॥** (२-१५)

अर्थात् ''समानबुद्धिवाले लोक कर्मोत्पन्न फळाला त्यागून जन्माच्या बंधनातून मुक्त होतात व निष्कलंक स्वरुपात मोक्षपद प्राप्त करतात.''

दुसऱ्या ठिकाणी म्हटलंय :

**जन्म कर्म च मे दिव्यमवयो वेन्तितत्वत।**
**त्याकत्वा पुनर्जन्मनोति मामति साड़र्जुन।** (४-६)

''हे अर्जुना, या प्रकारे जो माझ्या विचित्र जन्म व कर्माबाबतची वास्तविकता जाणतो, तो शरीर त्यागून पुन्हा जन्म घेत नाही.''

असेच पुन्हा म्हटले आहे.

**हतोवाआपस्य स्वर्ग जित्वावा मोक्ष्यसे महिम।**
**तस्मादुत्तिष्ट कौन्तैय युद्धाय कृतनिश्च॥**

''हे कृष्णा ! जर तू या युद्धात मारला गेलास तर तू स्वर्ग प्राप्त करशील।''

अल्लाहने अवज्ञाकारी व पापी लोकांकरिता नरक निर्माण केले आहे. कठोरतम् यातना, ज्यांची मनुष्याला कल्पना व संवयही नाही, त्या नरकात जाणाऱ्यास भोगाव्या लागतील.

कुरआनात म्हटलंय :

**ज्यांचा पारडे जड असेल, ते आगामी जीवन सुखात व्यतीत करतील व ज्यांचे पारडे हलके असतील त्यांचे स्थान 'हाबिया'' असेल व तुम्हाला 'हाबिया' बाबत माहिती आहे काय ? ती आहे तीव्र भडकणारी अग्नि.**

ऋग्वेद म्हणतो-

**इन्द्रसोमा समध शसमभ्यध तपुर्ययस्तु चरुर ग्रावाँइव।**

**इन्दसोमा दुष्कृतो बब्र अन्तरनार ममणे तमसि प्रविध्यतम।**

''हे कृपा व रौद्ररुप ! पापी माणसाच्या जवळपास पाप असे उकळते जसे अग्नीत भांडे उकळते.

दुसऱ्या ठिकाणी म्हटले गेले आहे.

**ये याकशेंस विहरन्तरावैर्येवा भद्रं दूषयन्ति स्वधामिः।**

**अहमेवा तानाप्रद सोम आवा दधातु निऋर्तरूपस्य॥**

अर्थात् 'फळाच्या आशा करणाऱ्याची चेष्टा करतात ते आपल्या सामर्थ्याने दोषारोपण करीत आहेत; त्यांना ईश्वर आपल्या शक्तीने पापाच्या ताब्यात देईल. अर्थात् त्यांना दु:खाच्या कुशीत बसवेल.

श्री व्यास मुनिने सांगितले आहे की

**परोपकार, स्वगाय पापय परपीडनम्**

अर्थात् - परोपकारी स्वर्गात जातो व इतरांना दु:ख देणारा नरकात !

भूतपूर्व राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन यांनी आपले पुस्तक (Indian Philosophy) मध्ये हिंदू धर्म व एकेश्वरवादा संदर्भात लिहिले आहे.

**मृत्योपरांत जीवनाविषयी आर्याकडे कोणतीच विशेष धारणा नव्हती मात्र स्वर्ग व नरकाबाबत विचार त्यांच्या बुद्धिला स्पर्श करुन गेले. आवागमनचा दृष्टिकोन अद्याप निर्माण झालेला नव्हता.**

*(इण्डियन फिलॉसॉफी १:११३)*

असे वाटते की वैदिक धर्मात कर्मदर्शना (कर्माची फळप्राप्ति) बाबत

आरंभकाळात योग्य दृष्टिकोन होता. नंतर त्याने दोषयुक्त व असंगत रुप धारण केले, ज्याला पुर्नजन्म म्हणतात. या तर्कास वैदिक विद्वान व दार्शनिक डॉ. राधाकृष्णन ही स्वीकार करतात.

पुनर्जन्माचा असा अर्थ आहे की मनुष्याच्या कर्मानुसार त्याला चांगल्या वा वाईट माणसाच्या, जनावराच्या वा वृक्षाच्या स्वरुपात आगामी जन्म प्राप्त होते व जन्मचक्र चालू राहते. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे मनुष्य, पशु वा वृक्षाच्या स्वरुपात जन्म घेणे हे मागील जन्माच्या कर्मांचा परिणाम मानायला हवा.

खरे सांगायचे म्हणजे पुनर्जन्माच्या धारणेत असे कोणतेच आकर्षण नाही की ज्यामुळे मनुष्य सत्कृत्याकडे वळेल वा त्याच्या भयाने मनुष्य दुष्कृत्यापासून परावृत्त होईल. कारण पुर्नजन्माच्या तत्वात यश किंवा यातनेचे स्पष्ट चित्र दिसून येत नाही. समजा की दुसऱ्या जन्मात माणसाला चांगले किंवा वाईट परिणाम प्राप्त होत असले तरी त्याला गत जीवनाचा तर संपूर्णतः विसर पडलेला असतो. कोणीही सांगू शकत नाही की गत जीवनात तो कोण व कसा होता. अशा घटनेला दण्ड वा पुरस्कार मानता येईल का ?

अनुभवांति सांगता येते की मनुष्य बदनामी किंवा शिक्षेच्या भयामुळे अपराध करण्याचे टाळतो. जेव्हा त्याला खात्री होते की अपराध केल्याने त्याची बदनामी ही होणार नाही व शिक्षाही मिळणार नाही तेंव्हा तो मोठमोठे गुन्हे करु लागतो. मात्र जेव्हा त्याला विश्वास होतो की त्याला पुन्हा जीवित करुन त्याच्या कर्मांचा हिशेब घेतला जाईल व त्यानंतर त्याच्या आगमी जीवनाबाबतचा निर्णय घेतला जाईल, तेव्हा तो पापांपासून दूर राहू लागतो.

याच धारणेनुसार जर मानवी जीवनाचे संचालन होऊ लागले तर ज्ञान-विज्ञान, सामाजिक, राजनैतिक, सांस्कृतिक इत्यादी जीवनातील सर्वच क्षेत्रात सुधारणा घडून येईल. या धारणेनेच मनुष्याला मोक्षाचा मार्ग प्राप्त होऊ शकतो.

# हिंदू धर्मात एकेश्वरवाद

**(दुर्गाशंकर सत्यार्थी)**

वेद हिंदू धर्माचा प्रामाणिक धर्मग्रंथ आहे. वेद स्वतः ईश्वराकडून वदले गेले आहेत. ऋग्वेदात एकेश्वरवाद निम्न स्वरुपात दिसून येतो.

**नोदयति यत्न नश्यति निर्वाति न निवर्ति प्रयच्छति च,**
**ज्ञानक्रिया स्वभावं तत्तेजः शाम्भवं जयति ।**

अर्थात्- 'जो उत्पन्न होत नाही' तो नष्ट होत नाही', तो मरत नाही व मृत्यु त्याच्या जवळ येत नाही.' त्याचे तेज केवळ ज्ञानाद्वारे ओळखले जाते तोच शिव आहे, सत्य आहे.

श्वेताश्वतर उपनिषद बघा

**यदा तमस्तन्न दिवा न रात्रिर्न सन्न चासाच्छिव एव केवलः।**
**तदक्षर तत्सबितुर्वरेण्यं, प्रज्ञाच तस्मात् प्रसृता पुराणी।**

*(श्वेताश्वतरोपनिषद् ४/१८)*

अर्थात् सृष्टिच्या प्रारंभकाळात जेव्हा केवळ अंधःकारच अंधःकार होता. दिवस ही नव्हता, रात्र ही नव्हती, सत अर्थात् कारण नव्हते व असत अर्थात् कार्य ही नव्हते. केवळ एक निर्विकार परबह्म विद्यमान होते. तेच सत्य होते व तेच आराधनेस पात्र होते.

महाभारतात हिंदू धर्मात पांचवा वेद मानतात याकडे थोडे लक्ष द्या.

**यत्र भूतपतिः सृष्टवा सर्वलोकान् सनातनः।**
**उपास्यते तिग्मतेजा वृत्तो, भूतै सहस्वशः।**

अर्थात् एक परब्रह्माने समस्त मानव तथा विश्वाची निर्मिती केली आहे. केवळ त्याचीच उपासना करा.

**अथर्वशिर उपनिषद मध्ये बघा :**
**यत्सूक्ष्मं तध्दैद्युतम, युध्दैद्यु तम् तत् परंब्रह्म,**
**यत् परब्रह्मा स एकः य एकः**

**स रुद्रः, यो रुद्रः स ईशानः य इशानः स भगवान महेश्वरः**
*(अथर्वशिर उपनिषद् ३)*

अर्थात् जो सूक्ष्म आहे तोच अद्बितीय आहे, जो अद्बितीय आहे तोच परब्रह्म आहे, जो परब्रह्म आहे तो एक आहे, जो एक आहे तो रुद्र आहे, जो रुद्र आहे तोच ईशान आहे व तोच भगवान आहे, जो ईश्वर आहे.

परमेश्वर सर्वांहून वेगळा आहे. ही बाब स्मृति मध्ये ही डिण्मिघोष वरुन स्पष्ट होते.

**सर्बेन्द्रियेभयः परमं मन आहुर्मनीषिणः ।**
**मनस श्चाप्यंहकारः अहंकारान्महान् परः ॥**
**महतः परमव्यक्तम व्यक्तात् पुरुषः परः ।**
**पुरुषा हा भगवान प्राणस्तस्य सर्गमदं जगत् ॥**
**प्राणात् परतरंव्योम व्योमातीतीड़ग्निरीश्वरः ।**
**ईश्वरान्न पवं किञ्चित्.................. ॥**

अर्थात्- सर्व इंद्रियांहून मन वेगळे आहे, मनाहून वेगळे अहंकार आहे, अहंकाराहून वेगळे महत्तत्व आहे। प्रकृति महत्तत्वापासून वेगळी आहे. पुरुष प्रकृतिहून वेगळा आहे. पुरुषाहून प्राण वेगळा आहे, प्राणाने संपूर्ण जग आहे, प्राणाहून वेगळे व्योम आहे व ज्योतिस्वरुप ईश्वर व्योमाहून वेगळे आहे अर्थात् दूर आहे परंतु ईश्वरापासून काहीच दूर नाही.

वेदात सुद्धा हेच म्हटले आहे.

**यस्मात्परं नापरमस्ति किञ्चित् ।**

अर्थात्- ज्याच्यापासून काहीं वेगळे नाही (दूर नाही) तोच ईश्वर आहे.

शिवपुराण मध्ये म्हटले आहे :

**यतः सर्व समुत्पन्नं येनैव पाल्यते हि तत् ।**
**यमिश्च लीयसे सर्व येन सर्वभिदं ततम् ॥**
**तदेव शिवरुपं ही प्रोक्यते हि मुनीश्वराः ।**

**सत्यं ज्ञानमनन्तंच चिदानन्द उदाश्रतः ॥**
**निर्गुणो निरुपाधिश्च निरज्जनोऽ व्ययस्तथा।**
**न रक्तो न च पतिश्च न श्वेतो नील एवं च॥**
**यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह।**
**तदेव प्रथमं प्रोक्तम् वहूमैव शिवसंज्ञितम् ॥**

अर्थात् - ज्याच्याकडून या विश्वाची उत्पत्ति, पालन व विनाश होतो, जो या सर्वात व्याप्त आहे। तेच वेदात सत्य म्हटले गेले आहे. तेच सत्य आहे, ज्ञानरुप आहे, तेच अनन्त आहे, असीम चिदानन्द आहे। तोच निर्गुण, निरुपाधि, निरज्ञंन व अव्यय (न संपणारा) आहे. तो रक्त, पीत, नील, श्वेतवर्ण नाही. तो शब्दांच्या सीमेच्या पलिकडे आहे. तोच परब्रहम एकमात्र सत्य आहे.

ऋग्वेद म्हणतो -

**त्र्यमबकं यजामेह सुगंन्धिपुष्टिवर्धनम्**
**उर्वारुकमिव वन्धान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥**

*(ऋग्वेद सातम मण्डल, सूक्त ५१)*

अर्थात्-ब्रहम मृत्यु पश्चात जीवनात सुधार निर्माण करण्यासाठी व अमृतस्थिति अर्थात् स्वर्गप्राप्तिसाठी योजना करणारा आहे.

माण्डक्योपनिषदांत आहे.

**नान्तः प्रज्ञं न बहिः प्रज्ञं नोभयतः प्रज्ञं न प्रज्ञानघनं**
**न प्रज्ञं ना प्रज्ञ महष्टम व्यवहार्य, मग्राहयमलक्षमचिन्तय**
**मव्यपदेश्य मेकात्मप्रठत्ययसारं प्रपाचोपशमं शान्तं**
**शिवमद्वैतं चतुर्थ मन्यन्ते, स आत्मा स विजेयः॥**

अर्थात्-ज्याला प्रज्ञा बहिर्मुख नाही, अंतर्मुख नाही व उभयमुख ही नाही व जो प्रज्ञाघन नाही, प्रज्ञ ही नाही व अप्रज्ञ ही नाही. ज्याचे वर्णन करता येत नाही. जो दिसू शकत नाही, जो कोणताच व्यवहार करीत नाही, ज्याला ग्रहण करता येत नाही, ज्याला कोणतीच लक्षणे नाहीत, ज्याला छिमता नाही, जो आदेशांच्या अधीन नाही, जो स्वयंसिद्ध आहे, ज्याला

प्रपंच नाही, जो शांत सत्य व अद्वैत (एकमात्र) व तृरीयपदस्थित आहे, तोच निरुपाधिक जाणण्यास पात्र आहे, तो महेश्वर आहे, स्वयंभू व ईशान आहे.

आता श्रीमद भगवतगीते कडे लक्ष द्या.

**अन्तबत्तु फलं तेषा तदभवत्यल्पमेघसाम्**
**देवान्देवय जो यान्ति मद्भक्ता याँति मायपि।**
**अव्यक्तं व्याक्तिमापन्नं मन्यते मामनुध्दये:**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम ।**
**नाह प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः**
**मृढोडयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम॥**

*(श्रीमद् भगवद्गीता, अध्याय ७२३, २४, २५)*

अर्थात्-माझ्या व्यतिरिक्त इतरांची पूजा करताना ते त्यांनाच प्राप्त होतात (अर्थात् दगड, नदी, डोंगराची पूजा करणाऱ्यांना दगड, नदी व डोंगरच प्राप्त होतात). मात्र मला पूजणारे मजपर्यंत पोहचतात, असे असूनही सर्व लोक माझी पूजा करीत नाहीत. (याचे कारण असे की बुद्धिहीन लोक मला माझ्या अनुत्तम अस्तित्वाशी परिचित नसल्यामुळे मी इंद्रियहीन असूनही मला मनुष्यासमान समजतात. मी प्रत्यक्ष त्यांच्यासमोर नसतो. त्यामुळे अज्ञानी मनुष्य मला (ज्याला जन्म व मृत्यु नाही) तत्वतः ओळखत नाही, ते मला जन्मणारा व मृत्यु पावणारा मानतात.

उपरोक्त सर्व उदाहरणांवरुन लक्षांत येईल की ईश्वर केवळ एक आहे, त्याला जन्म नाही, मृत्यु नाही, सृष्टिच्या निर्माण पूर्व केवळ तोच होता, त्यांनेच संपूर्ण विश्वाची रचना केली आहे, तो सर्वांपासून वेगळा आहे, तो निर्गुण आहे, त्याला न लाल रंग आहे. न पिवळा, न निळा, न पांढरा तो इंद्रियांनी पाहिला जात नाही, तोच सत्य आहे, तो आमचा पूज्य आहे, जर आम्ही त्याची पूजा करीत नाही तर आम्ही त्याची अवज्ञा करतो. परिणाम स्वरुप आम्ही त्याच्यापर्यंत पोहचू शकत नाही. तो एक आहे. केवळ एक व बुद्धिमान माणसाने त्याचीच उपासना करायला हवी. त्याला जन्मणारा व मृत्यु पावणारा समजता कामा नये.

आता ह्याच शिकवणी कुरआनाच्या आयतीत वाचा -

**अल्लाह जो चिरंतनजीवी आहे त्याने तमाम सृष्टीचा भार सांभाळला आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तो झोपत ही नाही आणि त्याला झोपेची गुंगीही येत नाही, पृथ्वी आणि आकाशात जे काही आहे त्याचेच आहे. असा कोण आहे जो त्याच्यापुढे त्याच्या परवानगीशिवाय शिफारस करु शकेल ? जे काही दासांच्या समक्ष आहे त्याला ही तो जाणतो आणि जे काही त्यांच्यापासून अदृश्य आहे त्याचे ही त्याला ज्ञान आहे, त्याच्या ज्ञानातील कोणती गोष्ट त्यांच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही. या व्यतिरिक्त की एखाद्या गोष्टीचे ज्ञान तो स्वतःच त्यांना देऊ इच्छित असले. त्याचे राज्य आकाश व पृथ्वीवर पसरलेले आहे आणि त्यांचे संरक्षण काही त्याला थकवून सोडणारे काम नव्हे. फक्त तोच एकटा महान व श्रेष्ठ आहे.** *(कुरआन २:२५५)*

**आमच्या पालनकर्त्याचे वैभव अति उच्च आणि श्रेष्ठ आहे त्याने कुणाला पत्नी अथवा पुत्र बनविले नाही.** (कुरआन ७२:५)

अशा प्रकारे आपल्या लक्षात येते की ज्या एकेश्वरवादाची कुरआनाने शिकवण दिली आहे तेच हिंदू धर्माचे मूलाधार आहे. वास्तविक पाहता धर्मात जे काही आहे ते केवळ ईश्वरीय सत्य आहे. इस्लाम अनुसार जगात जवळपास एक लाख चोवीस हजार प्रेषित आले असावेत व त्यापैकी प्रत्येकाने एकच सत्य धर्माची शिकवण दिली आहे. भारतात ज्यावेळी सत्यधर्माचे अवतरण झाले त्याचे नांव हिंदू धर्म होते व अरबस्थानात जेव्हा सत्य धर्माचा प्रसार झाला तो इस्लाम होता. आपला हिंदू धर्म ही त्याच ईश्वराकडून आला आहे ज्या ईश्वराने अरबस्तानात इस्लाम धर्म अवतरित केला. निश्चितच ईश्वर एक आहे : त्याच्यासारखा इतर कोणीच नाही (न भूतो न भविष्यति).

आतापर्यंत तर मी आपल्यासमोर हिंदू धर्माच्या विभिन्न धर्मग्रंथातून एकेश्वरवादाचे उदाहरण प्रस्तुत केले आहेत (ज्या ग्रंथाचा मी वर उल्लेख केला

आहे, (क्षमा करा) त्या सर्वांना धर्मग्रंथ समजणे मला उचित वाटत नाही कारण त्यात धर्माव्यतिरिक्त अवांतर गोष्टींचा ही समावेश करण्यात आला आहे).

आता आपण वेदांकडे वळू या.

वेद हेच हिंदू धर्माचे मूळ ग्रंथ आहेत. याबाबत एकमत आहे. आता मला असे सांगायचे आहे की वेदच हिंदू धर्माचे ग्रंथ आहेत. इतर ग्रंथ हिंदू धर्माचे ग्रंथ नाहीत. मला खात्री आहे की कोणताही हिंदू माझ्या या विधानाशी असहमति दर्शविणार नाही. हे बघा, वेद संपूर्णतः एकेश्वरवादाबाबत कशी शिकवण देत आहे.

**ऋग्वेद, प्रथम मंडल, प्रथम अनुवाक सुक्त-१, अग्निमीले पुरोहित यज्ञस्य देवमृत्विजम होतार रत्नघातमम ।।१।।**

'यज्ञाची पुरोहित होऊन अग्नि समान प्रकाशमान व ज्यास मृत्युवर विजय प्राप्त आहे, अर्थात् ज्यास मृत्यु नाही, त्याची उपासना करा, जो रत्नयुक्त पृथ्वीचा रचयिता आहे (अर्थात् परमेश्वरानेच ही रत्नजडित पृथ्वीची रचना केली आहे। तुम्ही केवळ परमेश्वराचीच उपासना करा).।।१।।

**अग्निः पूर्वे भिऋर्टसिभिरीडियो नूतनैरुत।स देवाँ एक वअति।।२।।**

पूर्वकाळात ऋषींनी ज्याची उपासना केली होती व आताही ऋषिगण ज्याची उपासना करतात त्याच प्रकारे आम्हास पूज्य माना. मीच एक आराध्य ईश्वर आहे. ।। २।।

**अग्निंना रयिमश्नवत पोषमेव दिवेदिवे। यशस वीखत्तमम।।३।।**

''आम्हीच तुम्हाला धन प्रदान करतो, तुमचे पालन पोषण करतो व धर्मयुद्धात वीरत्व प्रदान करतो (ईश्वरानेच सर्व काही दिले आहे व आम्ही त्याचीच उपासना (पूजा) करायला हवी) ।।३।।

**अग्ने यँ यजमह बरं विश्वतः परिभूरसि। स इद्देवेषु गच्छति।।४।।**

"ज्याप्रकारे अग्नि यज्ञाचा आधार आहे त्याच प्रकारे आम्ही (ईश्वर) विश्वाचे आधार आहोत. आम्हीच संपूर्ण विश्वात व्याप्त आहोत. हे जग मात्र दुसऱ्या देवाची पूजा करीत असते ।।४।।

**आग्होर्ता कविक्रतुः सत्याश्चित्रश्रवस्तमः । देवोदेवेभिरागमत ।।५।।**

ज्या प्रकारे आग होतोने निर्माण केली गेली आहे त्याच प्रकारे सत्य आदि चरित्र आम्ही तयार केले आहेत. देव (तर) देवांबरोबर येतात (अर्थात्) देवातादि ईश्वराने निर्माण केले आहेत. ज्याप्रमाणे होत्या अग्नि निर्माण करतो त्याच प्रकारे ईश्वराने अग्नि पासून देवतां निर्माण केले आहेत. याचा अर्थ असा होत नाही की ईश्वराच्या उपासनेत त्यांना ही सामील करुन घेण्यांत यावे). ।।५।।

हे आहेत ऋग्वेदांचे प्रारंभिक पांच श्लोक. येथे तर मी केवळ पांचच श्लोक दिले आहेत. मात्र संपूर्ण ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद तथा अर्थवेद सर्वच अशाच श्लोकांनी भरलेले आहे. उदाहरणार्थ पुढे ऋग्वेदातील आणखी काही श्लोक दिले आहेत. त्यात अनेकेश्वरवादाचा नामोल्लेख सुद्धा केलेला नाही.

**सुरुप कृत्तुमूतये सुदुधामिव गोदुहे।**
**जुहुमसि छवि छवि ।।१।।**
**उप नः सवना गहि सीमस्य सोमयाः पिब। गोदा इंद्रवलतो मदः ।।२।।**
**अथा अन्तमाना विद्याम सुमतीनाम। मा नो अतिख्या आ गहि ।।३।।**
**परेहि विग्रमस्तृत मिन्द्रं पृच्छा विदाश्चितम।**
**यस्ते साखिवम्य आ वरम ।।४।।**
**उत बु वन्तु नो निदो निरन्यतश्चिदारत।**
**दधाना इंद्र इददुवः ।।५।।**

अर्थात्-सुंदर दिसणाऱ्या मूर्ति तयार करुन, गायीचे दूध काढून, द्यवि-द्यवि अर्थात् दिवि दिवी अर्थात् सर्वत्र मूर्तिपूजा करीत असतात. ।।१।। आमच्या सर्व मार्गानि परित्याग करुन चंद्रमाचे महत्व विसरुन मद्यप्राशन करतात (अर्थात् मूर्तिपूजक ईश्वराच्या शक्ति व सामर्थ्याचा विचार न करता

मूर्तिपूजेच्या नशेत धुंद राहत) हे नशेत धुंद होऊन शुद्ध हरवून बसलेत. ॥२॥

ते अंतिम दिवसाला विसरुन विद्या व बुद्धिचा अपमान करुन आम्ही निश्चित केलेल्या सीमां चे उल्लंघण करीत आहेत. ॥३॥

आपल्या विशाल इंद्रियांच्या शक्ति पलिकडील आपत्तींचा पत्ता शोधत आहेत. त्यांचे साथीदार त्यांच्याकरिता श्रेष्ठ आहे (आम्ही त्यांना आपत्तीच देणार आहोत) ॥४॥

व ते आमची निंदा करतात. तुम्ही जे इंद्रियांना वशीभूत करणारे आहात, आमचे स्तवन (स्तुति) करा व धर्महीन लोकांना दूर जायला सांगा (अर्थात् त्यांना देशांतर करायला भाग पाडा. ते पवित्र आर्यावर्तमध्ये राहण्यायोग्य नाहीत. ॥५॥

ऋग्वेद प्रथम मंडल, द्वितीय अनुवाक, सूक्त ४

हा आहे आमचा मूळ धर्मग्रंथ ऋग्वेद, उपरोक्त श्लोकांवरुन लक्षात येईल की अनेकेश्वरवाद वेदांविरुध्द आहे. जर वेदांस आम्ही मूळ ग्रंथ मानतोय तर अनेकेश्वरवादाचे समर्थन योग्य नाही. वेद मूर्तिपूजेचा विरोध करतात व उपरोक्त श्लोकांवरुन सिद्ध होते की ईश्वर एक आहे व त्याच्या व्यतिरिक्त इतर कोणीही आराध्य नाही.

वेदाच्या या तत्वांची जगाच्या इतर धर्म ग्रंथाकडून समर्थन केले गेले आहे. तौरात इंजील, तलमूद, जबूर व कुरआनही वेदांच्या शिकवणीचे समर्थन करतात.

हिंदू धर्माचा वर्तमान काळातील धर्मग्रंथ (जे मनुष्य निर्मित आहेत) अनेकेश्वरवादाची शिकवण देतात. कुरआनचा एक पण श्लोक वेदांच्या श्लोकांविरुद्ध नाही. आता तुम्हीच विचार करा की एकेश्वरवाद ज्याचे सर्वच धर्मग्रंथ समर्थन करतात ते सत्य आहे की अनेकेश्वरवाद ज्याला वेदही सम्मति देत नाही व इतर धर्मग्रंथ ही समर्थन करीत नाहीत? यापेक्षा अधिक मला काही सांगावेसे वाटत नाही. ईश्वर परम कृपाळू आहे व त्याने तुम्हा आम्हा सर्वांना बुद्धि दिली आहे.

# दोन अप्रिय शब्द :- "काफिर व जिहाद"

## सुरेंद्रसिंह काद्रियाण

काफिर व जिहाद या दोन शब्दांना इस्लाममध्ये विशेष महत्व प्राप्त आहे. कुरआनवर जे इतर धर्मीय दोषारोपण करतात त्याचे कारण आहे या दोन शब्दांचा योग्य अर्थ समजून न घेणे. सर्वसामान्य मुस्लिमांना सुद्धा या दोन शब्दांचा खरा अर्थ माहीत नसतो. या शब्दांच्या अनर्थाने भारतातील हिंदू-मुस्लिमांमध्ये अविश्वास व शंकेची भिंत उभारली आहे; त्यांच्यात आपसांत फूट पडली आहे. कुरआन प्रेम व एकतेची शिकवण देत असतो. या दोन शब्दांचे सखोल अध्ययनही केले गेले नाही वा सत्यार्थ प्रगट करणाऱ्या साहित्याची निर्मिति ही केली गेली नाही. याच कारणामुळे हिंदू धर्मियांपुढे इस्लामचे हिंसक रुप प्रगट झाले आहे. इस्लामला 'तलवारीचा धर्म' संबोधिले जाते यास हिंदूपेक्षा जास्त मुस्लिम समाज व विशेषत: साहित्यिक अधिक दोषपात्र आहेत. मुसलमानाच्या साम्राज्यवादी धोरणामुळे इस्लामबाबत चुकीची धारणा निर्माण झाली असे म्हटल्यास अतिश्योक्ति होणार नाही. अनेक मुसलमान बादशाह जे इस्लाम धर्माचे प्रचारक होते - कुरआनच्या मूळ भावनेपासून दूर होते. या दोन शब्दांचा अर्थ काय आहे, हेच येथे स्पष्ट करावयाचे आहे.

'काफिर' चा अर्थ आहे 'इन्कार करणारा'. कुरआननुसार चार प्रकारचे काफिर असतात. जे लोक ईश्वराच्या एकत्व व त्याच्या प्रभुत्वावर विश्वास करीत नाही ते कुरआननुसार काफिर मानले जातात. वेदांमध्ये त्यांना नास्तिक म्हटले गेले आहे.

'काफिर' च्या या परिभाषे अंतर्गत मूर्तिपूजक येतात. कुरआनात अशा लोकांनाही काफिर म्हटले आहे जे देवी देवतांना तर मानतातच, उलट मुसलमान एकेश्वरवादी आहेत म्हणून त्यांना नाना प्रकारे छळतात व त्यांच्या धर्मात बाधा निर्माण करतात. अशाच प्रकारच्या काफिरांबाबत कुरआनात म्हटले आहे की 'जेथे सापडतील तेथे त्यांना ठार मारा' पहिल्या प्रकारच्या काफिरांबाबत असे कठोर आदेश कुरआनात देण्यात आलेले नाहीत.

बळजबरी ने धर्मांतर करण्याबाबत कुरआनात आदेश देण्यात आलेले नाहीत. कुरआननुसार ते लोक ही काफिर आहेत ज्यांचे बाह्यरंग तर साधूसंतासारखे आहे मात्र त्यांचे अंतरंग अहंकार, द्वेष, घृणा, स्वार्थ असत्यादिने रंगलेले आहे. असे ढोंगी प्रत्येक धर्मात (इस्लाम धर्मात सुध्दा) आढळतात. कुरआन सर्व धर्माच्या ईशग्रंथाचा तसेच महापुरुषांचा आदर व सम्मान करतो. धर्मग्रंथाचा तसेच महापुरुषांबद्दल द्वेष बाळगणारा व स्वार्थासाठी भेदभाव निर्माण करणाऱ्यास ही कुरआन काफिर मानतो. या चार प्रकारच्या काफिरांपैकी दुसऱ्या प्रकारचे काफिर जे बळजबरी युद्धजन्य परिस्थिती निर्माण करीत होते बाधक मानले गेले. अन्यथा 'रजोन' अनुसार मुहम्मद (स.) यांची शिकवण होती की "जो तुझ्यावर अन्याय करेल, त्याला तू क्षमा कर, जो तुला आप्तजनापासून दूर करेल त्याला तू जवळीक दे, जो तुझ्याशी वाईटपणाने वागेल त्याच्याशी तू चांगुलपणाने वाग, व सदैव सत्य बोल, त्या सत्याने तुला कष्ट सहन करावे लागले तरी चालेल."

दुसरा विवादास्पद शब्द 'जिहाद' आहे. या शब्दांच्या संदर्भात मौलवी मुहम्मद अली यांनी आपले पुस्तक 'The Holy Quran मध्ये एका ठिकाणी म्हटले आहे की, जिहाद चा "तलवारीने लढणे" असा अर्थ लावणे म्हणजे अरबी भाषेचे अज्ञान प्रगट करणे होय.

कुरआनच्या सूरह क्रमांक २५ मधील आयत क्रमांक ५२ मध्ये मुहम्मद (स.) यांना उद्देशून म्हटले गेले आहे की, "कुरआनच्या माध्यमातून लोकांशी जबरदस्त जिहाद करा." अर्थात् कुरआनच्या शिकवणीचा संपूर्ण शक्तिनिशी प्रसार व प्रचार करा व लोकांना त्याचा वास्तविक परिचय करुन द्या. या आयतीनुसार सत्याचा प्रचार करणे साधासुधा जिहाद नसून सर्वात मोठा (जिहादे कबीर) मानला जातो. मौलवी मुहम्मद अली तैजाब, इमाम असीरुद्दिन व अबू हयान यांनी या आयतीचा असाच आशय समोर मांडला आहे.

'जिहादे अकबर' अशा प्रयत्नास म्हणतात

ज्याच्याद्वारे मनुष्य 'जितेंद्र' होतो अर्थात् आपल्या वासनांवर संयमाने अंकुश लावतो, क्रोध, द्वेष, कामवासनेवर काबू मिळवितो. मुहम्मद (स.) यांचा एक उपदेश आहे ''सर्वात मोठा जिहाद म्हणजे आपल्या इंद्रियांवर काबू मिळविणे होय अर्थात् राग व इंद्रियजन्य इच्छांवर मात करणे होय''. इस्लामिक आचरणात नमाज पढणे, रोजे पाळणे, दान देणे इत्यादि पुण्य कार्यात अधिकाधिक वेळ खर्च करणे म्हणजे ''मुजाहिद'' होय.

शत्रूंच्या अमानुष अत्याचारास कंटाळून जे मुसलमान स्थलांतर करीत मात्र सत्यधर्मापासून विचलित होत नसत. त्यांच्या अशा वर्तनास ही कुरआनात (१६-११०) 'जिहाद' म्हटले आहे.

मुफ्रदात-इमाम रागिब ताज-उल-उरुस यांच्यानुसार 'जिहाद' म्हणजे अशी कोणतीही बाब जी योग्य नाही (चुकीची आहे), त्यास दुरुस्त करण्याकरिता आटोकाट प्रयत्न करणे'' असा अर्थ होतो. कुरैशाच्या अत्याचाराने त्रस्त होऊन जे मुसलमान मक्का सोडून इथोपिया येथे निघून गेले होते. त्यांच्या या स्थलांतरास (कुरआन ८-७२, ७४, ७५) अल्लाहच्या मार्गात जीवित व वित्त ''जिहाद'' संबोधण्यात आले आहे. कुरआनच्या 'फी सबीलिल्लाह' चा अर्थ अल्लाहच्या मार्गात प्रयत्न करणे असा होतो. कुरआनात ठीकठिकाणी दया, प्रेम, भ्रातृभाव व सत्य यांना ईश्वराचा मार्ग म्हटले गेले आहे.

कुरआन समालोचकांच्या या उक्तीत तथ्य आहे की कुरआनांत कुठे ही जिहाद या शब्दाचा अर्थ शस्त्र उगारणे असा होत नाही. कुरआन ज्या ठिकाणी स्वतःच्या प्राणाच्या व धर्माच्या रक्षणार्थ तलवार उगारण्याचा आदेश देतो, त्या ठिकाणी (कुरआन २-१९० ते १९५, ३१६, ४-७४, ७५, ८४, ९०, ९४, ६१-४) जिहाद शब्दाऐवजी 'किताल' शब्दाचा (अर्थात् कत्तल करणे) प्रयोग करण्यात आला आहे.

शांति, विचार-विनिमय तथा प्रेमा द्वारे एखाद्या व्यक्तीस इस्लामची दीक्षा देण्याच्या प्रयत्नास ही कुरआनात (९-७३, ३६-९) 'जिहाद' ही संज्ञा देण्यात आली आहे.

# जिझिया

**(भगवतीचरण शुक्ल)**

'जिझिया' एक छोटा शब्द आहे. मात्र या शब्दाने इस्लामला भारतात चांगलेच बदनाम केले आहे. इस्लामच्या बाबतीत हा चेष्टेचा विषय झाला आहे.

जिझिया केवळ इस्लामी राज्य (मुस्लिम राज्य नव्हे) वसूल करु शकतो. त्या बाबतीत ही काही अटी लागू आहेत. एखाद्या गैर इस्लामी राज्य इस्लामी राज्याशी युद्ध करून इस्लामी राज्याला नष्ट करण्याचा प्रयत्न करतो व नंतर युद्धबंदीचा तह करण्याचा प्रस्ताव पुढे करतो अशा परिस्थितीत इस्लामी राज्य ज्या अटी त्याच्यापुढे ठेवते त्यात जिझियाचा समावेश असतो. मात्र जिझियाचा प्रस्ताव ठेवण्यापूर्वी शत्रू राज्याने सत्यधर्माचा स्वीकार करावा अशी अट घातली जाते. जेव्हा शत्रू देश सत्यधर्माचे आमंत्रण अस्वीकार करतो तेव्हा जिझिया कर लादला जातो.

गैरमुस्लिम जे इस्लामी राज्यात राहतात (मुस्लिम राज्यात नव्हे) त्यांच्याकडून जिझिया कर घेता येतो.

ही गोष्ट लक्षात असली पाहिजे की इस्लामी राज्य गैरमुस्लिमांकडून जिझिया तर घेऊ शकतो मात्र इतर कुठलेच टॅक्स वसूल करु शकत नाही. उलट मुस्लिमांकडून जकात अनिवार्यरित्या वसूल केली जाऊ शकते. त्याच प्रमाणे मुसलमानांना अन्य टॅक्स ही द्यावे लागतात. स्पष्ट आहे की मुस्लिमेतरांकडून कोणता ना कोणता टॅक्स वसूल करायलाच हवा. मात्र इस्लामी राज्यास वाटले की अशा टॅक्सच्या वसूली शिवायही काम भागू शकते तर जिझिया वसूल करण्याची गरज राहत नाही. दीनहीन दशेत

असलेल्या व्यक्तिवर जिझिया मुळीच लादता कामा नये. अशा परिस्थितीत त्यांच्यावर सामान्य कर लागू करता येतो.

हे लक्षात ठेवायला हवे की इस्लामी राज्यात मुस्लिमेतरांना मुलभूत अधिकारांसह सुरक्षा, सामाजिक स्वातंत्र्य, विचार अभिव्यक्ति वगैरे बाबींची हमी दिली जाते.

भारतीयांनी 'जिझिया' करास अपमानास्पद बाब मानली कारण जिझिया इस्लामी राज्याने नव्हे तर मुसलमान राज्याने वसूल केला होता. हिंदूंना माहित झाले होते की जिझिया तुर्की राज्याकडून त्यांच्यावर लादला गेला होता. तो सत्यधर्माने लादला नव्हता. ऐरवी धर्म व धार्मिक नियमांच्या बाबतीत श्रद्धेने वागणारे, आस्था व सम्मानाचे आचरण करणारे हिंदू ज़िझिया कराने अपमानित झाले नसते उलट त्यांनी ते श्रद्धापूर्वक अदा केले असते. औरंगाजेब सारख्या शासकाने (सामान्य मुसलमानांनी नव्हे) हिंदू धर्मीयांच्या मनात जिझिया व इस्लामच्या बाबतीत तिरस्काराची भावना निर्माण केली.

# आपणांस काय व्हावेसे वाटते ?

**श्री. कंवल भारती – रामपूर**

स्वर्ग व नरक हे दोन शब्द आपण आदिकालापासून ऐकत आहात. तुम्हाला हे ही माहित आहे की स्वर्गात मनुष्याला सर्व सुख प्राप्त होतील व नरकांत भयंकर यातना सहन कराव्या लागतील. आपल्याला काय हवे आहे. स्वर्ग वा नरक ? आपण लगेच उत्तर द्याल 'स्वर्ग'. कारण स्वर्गाबाबत तुम्हाला अगोदरच माहिती प्राप्त आहे. पण ती अर्धवट आहे. प्रथम आपणांस दोहोंबद्दल सविस्तर माहिती प्राप्त होणे आवश्यक आहे. स्वर्ग कोण प्राप्त करु शकतो ? नरकात कोणास ढकलले जाईल ? मग त्यावर विचार करा. त्यानंतर निर्णय घ्या की तुम्हाला काय हवंय.

## नरक

कुरआनांत नरकासाठी 'जहन्नुम व आग' शब्दांचा प्रयोग करण्यात आला आहे. हे तेच नरक आहे ज्या बाबत हिंदू धर्माच्या गरुड पुराण मध्ये उल्लेख आहे.

**मध्य मार्गात एक वैतरणी नांवाची भयंकर नदी आहे जिला पाहूनच भीति वाटते. जिचे नांव ऐकून शरीरावर शहारे उभे राहतात. ती नदी शंभर 'योजन' रुंद आहे. ज्यात पूं, रक्त भरलेले आहे व तिचा किनारा हाडांनी तयार केला आहे. त्यात रक्त, मांस व पूंचा चिखल आहे. ती खूप खोल आहे व ती ओलांडता येत नाही. सुईस, मगरी, रक्त शोषणारे किडे व मांस भक्षक जलचर प्राण्याने ती भरलेली आहे.** *(गरुड पुराण १५-२०/२)*

इस्लाम मध्ये नरकाबाबत विस्तृत वर्णन आहे. लेखक त्याच्याच आधारे विस्तृत वर्णन देत आहे. नरकाबाबत कुरआनात उल्लेख आहे.

**तुम्ही सहन करु शकला नाहीत व कदापि करु शकणार नाही. तर भिऊन असा त्या भयंकर अग्निला ज्याचे इंधन असेल मानव व दगड. जो सत्याचा विरोध करणाऱ्यांसाठी भडकविलेला असेल.**

*(कुरआन अलबकरा (२:२४)*

ज्या लोकांनी आमची संकेत वचने मानण्यास नकार दिला आहे, त्यांना खचीतच आम्ही अग्नीत झोकून देऊ आणि जेंव्हा त्यांच्या शरीराची त्वचा गळून पटेल तेव्हा त्या जागी दुसरी त्वचा निर्माण करु जेणेकरुन ते प्रकोपाचा सतत आस्वाद घेत राहतील. अल्लाह प्रभुत्वशाली व तत्वशाली आहे. *(कुरआन ४:५६)*

ज्यांनी अंधश्रद्धेची पद्धत अवलंबिली त्यांनी उकळते पाणी प्यावे व दुःखदायक शिक्षा भोगावी, सत्याच्या इन्कारामुळे जे ते करीत राहिले. *(कुरआन १०:४)*

हे दोन पक्ष आहेत ज्यांच्या दरम्यान आपल्या पालनकर्त्यासंबंधी वितंडवाद आहे. यांच्यापैकी ते लोक ज्यांनी सत्य नाकारले, त्यांच्यासाठी अग्नीचा पोषाख तयार केला गेला आहे. त्यांच्या डोळ्यावर उकळते पाणी टाकले जाईल ज्यामुळे त्यांची केवळ त्वचाच नव्हे तर पोटाच्या आतील भागदेखील वितळेल आणि त्यांचा समाचार घेण्यासाठी लोखंडी घण असतील. *(कुरआन २२:९)*

आणि ज्यांनी मर्यादांचे उल्लंघन केले आहे त्यांचे ठिकाण नरक आहे, जेव्हां ते त्यातून बाहेर पडू पाहतील तिच्यातच ढकलून दिले जातील आणि त्यांना सांगितले जाईल की घ्या, त्याच अग्नी-प्रकोपांचा आस्वाद ज्याला तुम्ही खोटे ठरवीत होता. *(कुरआन ३२:२०)*

तुम्ही पाहिले, हे आहे नरक, जे नकार करणाऱ्यांना मिळणार आहे. विचार करा त्यांना नरकात कोणकोणत्या यातना भोगाव्या लागतील.

## स्वर्ग

आता स्वर्गाबाबत माहिती जाणून घ्या जे श्रद्धावंताना प्राप्त होणार आहे.

जे श्रद्धा धारण करतील व सद्‌वर्तन करतील त्यांना खुशखबर द्या की त्यांच्यासाठी अशी नंदनवने असतील ज्यांच्या खालून झरे वाहत असतील. या बागांतील फळे दिसण्यात जगातील फळांसारखीच असतील. जेव्हा त्यांना एखादे फळ दिले जाईल तेव्हा ते

म्हणतील की अशीच फळे यापूर्वी आम्हाला दिली जात असत त्यांच्यासाठी तिथे पवित्र व चारित्र्यवान जोडीदार असतील आणि ते सदैव तेथेच राहतील. *(कुरआन २:२५)*

त्यांची चिरकालीन निवासस्थाने असतील, ते स्वतः देखील त्यांच्यात प्रवेश करतील व त्यांचे वाडवडील व त्यांच्या पत्नी आणि त्यांच्या संततीपैकी जे जे सदाचारी आहेत ते देखील त्यांच्या समवेत तेथे जातील. दूत चोहोबाजूंनी त्यांच्या स्वागताकरिता येतील. (कुरआन १३:२३)

ज्यांनी पश्चाताप केला आणि श्रद्धा ठेवली आणि सदाचरण अवलंबिले ते स्वर्गामध्ये दाखल होतील आणि त्यांचे तिळमात्र ही हक्क मारले जाणार नाहीत. *(कुरआन १९:६०)*

त्यांच्यासाठी ज्ञात उपजीविका आहे. सर्व प्रकारचे स्वादिष्ट पदार्थ आणि ऐश्वर्यसंपन्न स्वर्गामध्ये ते सन्मानपूर्वक राहतील. तख्तांवर समोरासमोर बसतील. पेयाचे पात्र भरुन भरुन त्यांच्या दरम्यान फिरविले जातील. चकाकणारे पेय जे पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. त्याच्या शरीरालाही त्यापासून काही अपाय होणार नाही व त्यांची बुद्धिदेखील भ्रष्ट होणार नाही. आणि त्यांच्यापाशी लाजवंती टपोऱ्या नेत्रांच्या मोहक स्त्रिया असतील. *(कुरआन ३७:४८)*

पाहिलेत श्रद्धावंतासाठी ईश्वराकडून कोणते स्थान निश्चित करण्यात आले आहे. आता आपण स्वर्ग व नरक दोहोंबाबत भरपूर माहिती प्राप्त केली आहे. हे ही तुम्हास कळून चुकले आहे की स्वर्ग त्याच लोकांकरिता आहे, जे श्रद्धावंत आहेत व धर्मानुसार कर्म करणारे आहेत व नरकात लोकांना झोकण्यात येणार आहे, जे सत्य नाकारतात व निरंतर दुष्कर्म करीत राहतात ? आता आपण सहज निर्णय घेऊ शकता की आपणासि काय व्हायचे आहे. अर्थात आपणास सत्य नाकारणारे (काफिर) व्हायचे आहे की सत्यावान (श्रद्धावंत) व्हायचे आहे. जर आपणांस श्रद्धावंत व्हायचे असेल तर तुम्ही निर्विघ्नपणे स्वर्गात प्रवेश प्राप्त कराल व जर आपण सत्य नाकारणारे (काफिर) बनण्याचा प्रयत्न करीत असाल तर तुम्ही नरकाग्नीत सदा सदासर्वदा भाजले जाणार आहात. शांतपणे विचार करा, गंभीरपणे निर्णय घ्या की तुम्हाला काय व्हायचे आहे.

# सर्वश्रेष्ठ घोषणा

स्वामी विद्यानंत विदेह

जगातील सर्वच धर्माच्या आपापल्या घोषणा आहेत. सनातन धर्माची घोषणा होती - सियावर रामचंद्राची जय, कृष्ण बलदेवाची जय, पवनसुत हनुमानाची जय, उमापति महादेवाची जय, बम बम महादेव, हर हर महादेव, गडगे हर, जैन धर्माची घोषणा होती जय जिनेन्द्र, बुद्ध धर्माची घोषणा आहे 'बुद्धं शरणं गच्छामि' ख्रिस्तीयांची घोषणा आहे 'येशू ख्रिस्त ईश-पुत्र आहे. आर्य समाजाची घोषणा आहे 'वैदिक धर्माचा विजय असो', जगत्‌गुरु महर्षि दयानंदाचा जय असो', भारतमातेचा जय असो, गौ मातेचा जय असो, मुसलमानांची घोषणा आहे 'अल्लाहु अकबर', शिखांची घोषणा आहे 'सत् श्री अकाल' इत्यादि.

जगातील सर्व धार्मिक घोषणांपैकी केवळ ''अल्लाहू अकबर'' ही घोषणा माझ्या मनाला स्पर्श करते. ईश्वराची भक्ति करणाऱ्या सर्व धर्मापैकी इस्लामचा 'नारा-ए-तकबीर' अल्लाहू अकबर निश्चितच सर्वश्रेष्ठ आहे. मराठीत या घोषणेचा अर्थ आहे ''ईश्वर महान आहे व इंग्रजीत ''God is Great''. वेदांत ही म्हटले आहे ''त्व महां असि'' (प्रभू तू महान आहेस)

अल्लाहू अकबर 'God is Great, ईश्वर महान आहे - ही संपूर्ण सृष्टीची सर्वश्रेष्ठ घोषणा आहे. ईश-भक्ती करणारे सर्वच धर्माचे लोक या घोषणेचा स्वीकार करुन धार्मिक सलोख्याकडे वाटचाल करीत राहतील. अशी आशा आहे.

# सत्याचा एक स्वर

तुम्हाला माहित आहे ना की अल्लाहने शुभ व सत्य गोष्टी बाबत कशी उपमा दिली आहे. ती एक शुभ वृक्षासारखी आहे. जिची मुळे खोलवर रुजली आहेत, त्याच्या फांद्या आकाशाला भिडल्या आहेत, जे आपल्या ईश्वराच्या आज्ञेनुसार फळ देत आहे. अल्लाह या सर्व उपमांचे वर्णन करीत आहे की जेणेकरुन लोकांनी लक्ष द्यावे. अशुभ (व असत्य) गोष्टींबाबत अशी उपमा दिली आहे की ते असे वृक्ष आहेत (की ज्याची मुळे ही मजबूत नाहीत व फांद्याही उंची गाठू शकल्या नाहीत) कोसळून पडतील व त्याला स्थैर्य प्राप्त नसेल.

श्रद्धावंतांना अल्लाह एका दृढ वचनाच्या आधारावर इहलोक व परलोकात स्थैर्य प्रदान करते आणि अत्याचाऱ्यांना अल्लाह पथभ्रष्ट करतो. *(कुरआन १४:२४-२६)*

जो कोणी माझे म्हणणे ऐकून घेतो व त्यानुसार आचरण करतो तो बुद्धिमान व्यक्ति मानला जाईल. ज्याने शिलाखंडावर आपले निवासस्थान बांधले आहे त्यावर पाऊस पडला, वादळाने त्या घरावर मारा केला तरी ते घर कोसळणार नाही कारण त्याचा पाया मजबूत शिलाखंडावर उभारला गेला आहे मात्र जो माझे म्हणणे ऐकतो पण त्यानुसार वागत नाही तो असा मूर्ख व्यक्ति आहे की ज्याने आपले घर वाळूच्या थरावर उभे केले आहे व पाऊस पडताच, पूर येताच, वादळ येताच, ते कोसळून पडते व नष्ट होते. *(मत्ताची इंजिल अध्याय ७)*

आणि जेव्हा माझे भक्त तुम्हाला माझ्याबद्दल विचारतील तर (त्यांना सांगा की) मी तर सदैव त्यांच्याजवळ आहे. प्रार्थना करणारा जेव्हा मला विनंति करतो तेव्हा मी त्याच्या हाकेला प्रतिसाद देतो. त्याने माझ्या प्रतिसादाचा शोध घ्यावा. माझ्यावर श्रद्धा ठेवावी जेणेकरुन ते सन्मार्गावर अग्रेसर होतील *(कुरआन २:१८६)*

मागाल तर तुम्हाला दिले जाईल, शोधाल तर मिळेल, दार

ठोठावाल तर दरवाजा उघडला जाईल; कारण जो मागतो त्याला प्राप्त होते, जो शोधतो त्याला सापडते, जो ठोठावतो त्याला प्रवेश मिळतो. तुमच्यापैकी असा कोण आहे जो आपल्या मुलाने चपाती (भाकरी) मागितल्यावर दगड देतो, मासळी मागितल्यानंतर सांप देतो. तुम्ही दुष्कर्मी असून आपल्या मुलाला चांगल्या वस्तु देण्याची इच्छा बाळगता, मग जो तुमचा आकाशातील पिता आपल्या भक्तांना (त्यांनी प्रार्थना केल्यास) चांगल्या वस्तू का देणार नाही ? म्हणून जे वर्तन तुम्ही तुमच्याबाबतीत इतरांकडून इच्छिता, तसेच वर्तन तुम्ही ही दुसऱ्यांशी करा. कारण तौरात व प्रेषितांनी अशीच शिकवण दिली आहे. *(मत्ताची इंजील, अध्याय ७)*

हे श्रद्धावंतांनो, तुम्ही सर्वोत्तम जनसमुदाय आहात, तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारापासून परावृत्त करता व अल्लाहवर श्रद्धा बाळगता. *(कुरआन ३:११०)*

तुम्ही जमिनीचे मीठ आहात. मात्र मिठाची चव नष्ट झाली तर मग त्याला खारटपणा कसा देता येईल. मग तो निरुपयोगी सिद्ध होईल व बाहेर फेकला जाईल व लोकांच्या पायदळी तुडवला जाईल. तुम्ही जगासाठी प्रकाश आहात. जी लोकांवरती पर्वतावर स्थित आहे ती लपून राहू शकत नाही. दिवा खाली न ठेवता उच्च स्थानी ठेवल्यास घरातील सर्व लोकांना प्रकाश प्राप्त होतो. याकरिता तुमचा प्रकाश लोकांपर्यंत पोहचावा जेणेकरुन ते तुमच्या सत्कर्माच्या प्रभावाने तुमच्या आकाशातील पित्याचे गौरवगान करतील

*(मत्ताची इंजिल-अध्याय ५)*

# धार्मिकतेचा सत्यार्थ

धर्म म्हणजे काय ? मनुष्याने कोणते धर्म स्वीकारावे विद्वानाचे मत असे आहे की तोच धर्म खरा धर्म आहे जो एका मानवी समूहासच नव्हे तर संपूर्ण मानव समाजाला स्वीकार्य असतो व ज्यानुसार ते आपले व्यक्तिगत व सामाजिक जीवनाची निर्मिती करु शकतात. असा तोच धर्म असू शकतो ज्यात संपूर्ण मानवांना समान दृष्टीने पाहिले जात असेल, ज्यात मानव मानवामध्ये अंतररेखा ओढली गेली नसेल. सर्व मानवांना समान आदर दिले गेले असेल व सर्वांचे समान हित चिंतले गेले असेल व हितचिंतन प्रत्येक क्षेत्रासंबंधात असेल. सर्वांकरिता केवळ नैतिक व अध्यात्मिकच नव्हे तर आर्थिक व राजनैतिक उन्नतिचे द्वार उघडे ठेवले गेले असतील. हा तोच धर्म असेल ज्याद्वारे प्रत्येक व्यक्तिला आपल्या योग्यतेनुसार विकासाठी संधी व समाज व राज्याकडून सहकार प्राप्त होत असेल व ज्याच्या विचारानुसार एका व्यक्तीची अकारण हत्या संपूर्ण मानवतेच्या हत्येसमान भयंकर अपराध मानला जात असेल. त्या धर्मानुसार कोणत्याही जाति जमातीच्या एका व्यक्तीचा अपमान, हा संपूर्ण मानवतेचा अपमान मानला जात असेल.

धर्मांनी चरित्रावर बरीच भर दिली आहे. चरित्र निर्माणला जीवनाची सर्वात मोठी तपस्या मानली गेली आहे. चरित्रास अत्यंत विस्तृत व अखंड स्वरुपात पाहिले गेले आहे. चरित्रास प्रकाशाची उपमा देण्यात आली आहे. जेथे प्रकाश असेल तेथील प्रत्येक वस्तु व स्थान प्रकाशित होईल तेथे कुठेच अंधकारमय वातावरण नसेल. एखादी व्यक्ति ईश्वराबाबत कर्तव्यांचे पालन करीत असेल मात्र आपल्या भाऊबंध व इतर लोकांच्या हक्कांबाबत उदासीनता दर्शवीत असेल तर तो त्याच्या चरित्राचा दोष मानला जाईल. याचा अर्थ असा की त्याच्या आत्म्याला ते प्रकाश व बळ अद्याप प्राप्त झालेले नाही की ज्याच्या अभावात उच्च चरित्राची कल्पना केली जाऊ शकत नाही.

धार्मिकदृष्ट्या ईशोपासना व मानवसेवा दोहोंत मनुष्याचे समान चरित्र दृष्टिगोचर होते. हेच मनोवैज्ञानिक तत्व प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या शब्दात व्यक्त होते.

"जी व्यक्ति मनुष्याशी कृतज्ञतेने वागत नाही, ती ईश्वरासमक्ष ही कृतज्ञता दर्शवू शकत नाही." धर्मात बरीच विकृती निर्माण झाली आहे, लोकांनी आपल्या स्वार्थ व संकीर्ण दृष्टिकोनामुळे धर्मास विकृत स्वरुप दिले आहे. परंतु धर्माचे गंभीरपणे अध्ययन केल्यास लक्षात येईल की जे काही वर म्हटले आहे ते धर्माचे समर्थन करते आम्ही खालील धार्मिक उद्धरण देत आहोत ज्यांनी आमच्या विचारांचे समर्थन होईल.

## १. इस्लाम :

तुम्ही लोकांकरिता तेच पसंत करा जे स्वत:करिता पसंत करता. तुम्ही खरोखर मुस्लिम (अल्लाहचे आज्ञाकारी) व्हाल.

**तुमच्यापैकी कोणीही मोमिन (मुस्लिम) होऊ शकत नाही जोवर तो आपल्या भावाकरिता ते सर्व काही पसंत करीत नाही जे तो स्वत:करिता पसंत करीत नाही.** *(हदीस)*

## २. हिंदू धर्म

**तुम्ही दुसऱ्याशी असा व्यवहार मुळीच करु नका, जे तुमच्याशी केल्याने तुम्हाला दु:ख होईल.** *(महाभारत ५:१५१७)*

## ३. बौद्ध मत

**तुम्ही दुसऱ्यासाठी असा मार्ग स्वीकारुन दुसऱ्यांना कष्ट देऊ नका जे तुमच्याच करिता कष्टदायक ठरेल.** *(Udansvarga 5:18)*

## ४. कन्फ्यूससवाद :

दुसऱ्याशी असा व्यवहार करु नका जो दुसऱ्याने तुमच्याशी करु नये असे तुम्हाला वाटते.

## ५. ताऊवाद (Taoism)

**आपल्या शेजाऱ्याच्या हित व लाभाचा त्याच प्रकारे आदर करा ज्याप्रकारे स्वत:च्या हित व लाभाचा तुम्ही आदर करता व**

**आपल्या शेजाऱ्याच्या हानि व नुकसानीला स्वत:ची हानि व नुकसान माना.** (Tai Shang Kan Ying Pien.

## ६. ख्रिस्ती धर्म

**जे लोकांनी तुमच्याशी करावे असे तुम्हाला वाटते, तेच तुम्ही त्यांच्याशी करा.** *(मत्ता ६:१२)*

## ७. यहुदी धर्म

**जी कृति तुमच्या स्वत:करिता अनिष्ट आहे, ती आपल्या साथीदारांबाबत ही करु नका. हे खरे विधान आहे, बाकी जे काही आहे ती केवळ व्याख्या मात्र आहे.** (Talmud Shabbat 3/a)

धर्माच्या या मुलभूत सिद्धांताबाबत विचार करा, असा कोणता मनुष्य आहे ज्याला वाटत नाही की त्याचे भले व्हावे व सर्व प्रकारच्या नुकसानीपासून त्याची सुरक्षा व्हावी. आता धर्माची शिकवण अशी आहे की त्याने आपली इच्छा व्यापक करावी. त्याने केवळ स्वत:चे नव्हे तर संपूर्ण मानवजातीचे हितचिंतक व्हावे.

त्याने केवळ स्वत:लाच हानि व दु:खापासून मुक्त करुन न घेता, त्याने इतरांचे रक्षक व सेवक व्हावे.

असा कोणता समाज आहे जो स्वत:चे कल्याण इच्छित नाही. सर्वच जातिजमाती आपला फायदा बघत असतात. प्रत्येक जाती जमातीचे हे धार्मिक कर्तव्य आहे की त्यांनी दुसऱ्या जातिजमातींचे ही हित जपावे, त्यांच्या उन्नतिचीही चिंता बाळगावी व या संबंधात आपण शक्य तितका सहभाग घ्यावा.

याचप्रकारे एका राष्ट्रा व देशाचेही कर्तव्य आहे की त्यांनी दुसऱ्या राष्टांचे मित्र व हितकर्ते बनावे व त्या संकुचित दृष्टिकोनापासून स्वत:ला मुक्त करावे ज्यामुळे एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचा शत्रू बनतो व जगात अशांतता व विकृति निर्माण होते.

# प्रश्नोत्तर

## जीवन साधना आहे व साध्यही

**प्रश्न :**

१) असे पाहण्यात आले आहे की प्राणी मुके, बहिरे, लंगडे, आंधळे वा विकलांग जन्माला येतात. ईश्वर त्यांना आपल्या इच्छेनुसार असा निर्माण करतो की ते आपल्या कर्मामुळे दु:ख भोगण्यासाठी असे जन्म घेतात ?

२) आत्मा (रुह) सर्व सजीवांमध्ये असते काय ? सर्वांचा आत्मा समान असतो काय ?

३) ईश्वर सर्वव्यापी आहे कां ? जर आहे, तर मग ईश्वर असतांना सर्वत्र भ्रष्टाचार, दुराचार का बोकाळला आहे.

४) कोणकोणत्या कारणाने मनुष्य पापी, दुराचारी वा पुण्यवान होतो ?

५) ईश्वरप्राप्तिचा सहज सुलभ प्राप्तीचा मार्ग कोणता ?

**(विश्वनाथ प्र. सिंह – मुझफ्फरपूर (बिहार)**

**उत्तर :**

आपण जीवनाच्या मुलभूत समस्यांबाबत विचार करता हे जाणून आनंद झाला. आपल्या प्रश्नाचे उत्तर संक्षिप्त देण्यात येत आहे.

१) मानवांमध्ये आम्ही जे रोगी-निरोगी, धनवान-निर्धन अशा अनेक प्रकारचे लोक पाहतो. याचे हे कारण नाही की लोक आपल्या गतजीवनातील चांगल्या वा वाईट कर्मामुळे या दशेला पोहचले आहेत व त्यांच्या जीवनावस्थेत त्यामुळे फरक दिसून येत आहे. त्यांच्या स्थितिच्या विविधतेची अन्य कारणे आहेत. त्यांत बरीचशी कारणे भौतिक व प्राकृतिक आहेत. जगाच्या अवस्थेत भौतिक

कार्यकारणांच्या शृंखलेला फार महत्व आहे. येथे मनुष्य आपल्या असावधानतेमुळे रोगग्रस्त होऊ शकतो व आरोग्य रक्षणाच्या नियमांचे पालन करुन निरोगीही राहू शकतो. कधी कधी आरोग्यवर्धक भोजन व आवश्यक औषधोपचार न मिळाल्याने ही आरोग्य बिघडते. कधी कधी आई-वडीलांच्या आजारपणामुळे संतति ही रोगिष्ट जन्माला येते. अशा काही उदाहरणावरुन लक्षात येते की जीवनात भौतिक व प्राकृतिक नियमाचे स्थान महत्वाचे आहे. प्रश्न असा निर्माण होतो की असे प्राकृतिक नियम का लागू करण्यात आले की ज्यामुळे जगांत यातना व सुख, रोग व स्वास्थ्य दोहोंचे अस्तित्व निर्माण झाले. याचे सरळ व सोपे उत्तर आहे की हे जग परीक्षा स्थळ आहे, केवळ भोग घेण्यासाठी नाही. याकरिताच येथे प्राकृतिक नियमांचे आवरण टाकण्यात आले आहे. येथे लोकांची दु:ख-सुख, संपन्नता-निर्धनता इत्यादि प्रत्येक अवस्थेत परीक्षा होत आहे. मात्र आगामी जीवनांत (मरणोपरांत जीवनांत) त्यांना आपल्या कर्मानुसार दु:ख-सुख भोगावे लागेल. तेथे अग्नि त्याच व्यक्तिला भाजू शकेल जो पापी असेल. त्या व्यक्तिला सुखच सुख प्राप्त होईल जो ईश्वराचा आज्ञाकारी व सदाचारी असेल.

२) सर्व सजीवांमध्ये असलेला आत्मा समान असतो असे मानता येत नाही. मानव-आत्मा केवळ मानवी शरीरातच असतो तो पक्षी व किटाणू आदिमध्ये नसतो. सूक्ष्म परीक्षणानंतर हे उघडकीस आले आहे की पक्षी व कीटाणूमधील आत्मा मानवाच्या शरीरामध्ये असलेल्या आत्म्यासमान नसतो. साधारण जीवजन्तू साध्या चेतनेच्या आधारावर (Simple consciousness) जगत असतात. या स्तरावर केवळ Sense हे ज्ञानाचे साधन असते. त्यांच्यात केवळ Instinct काम करीत असते. कीटाणूंना केवळ ऐंद्रिक ज्ञान (Perceptual Knowledge) प्राप्त असते Self Consciousness चा दर्जा केवळ मानवास प्राप्त असतो. मानवास Sense बरोबर

intelligence ही प्राप्त असते. मानवास (Perceptual Knowledge) व्यतिरिक्त (Conceptual Knowledge) ची क्षमता प्राप्त असते. मानवास जाणीव असते की त्याला ज्ञान आहे. सामान्य पशुला समज असते त्यांना माहित असण्याचे ज्ञान नसते. Self Consciousness केवळ मानवास प्राप्त असते. Ouspensky ने बरोबर म्हटले आहे की Self Consciousness ची क्षमता पशुच्या चेतना शक्तीच्या विकासाने त्यास प्राप्त होऊ शकत नाही. अर्थात् पशु हा पशूच राहील मानव होणार नाही.

३) ईश्वर सर्व-व्यापी व सर्व शक्तिमान् आहे. त्यांने इच्छीले तर जगातून भ्रष्टाचार व दुराचाराचे समूळ उच्चाटन होईल. परंतु त्याला मानवजातीची परीक्षा घ्यावयाची आहे. त्यासाठी त्याने आम्हाला स्वातंत्र्य दिले आहे की इच्छा असेल तर सदाचारी व्हा नाहीतर दुराचाराचा मार्ग अवलंबा. मानवास विकास व आत्म्याची परिपूर्णता प्राप्त करण्यासाठी साधना व तपश्चर्येची गरज असते हे लक्षांत ठेवायला हवे. अर्थात् साधना करतांना परीक्षा देणे अनिवार्य असते.

४) मनुष्याच्या स्वभावात दोन प्रवृत्ती आढळून येतात. चांगुलपणाची व वाईटपणाची. मात्र मानवाची खरी रचना चांगुलपणाच्या साच्यात निर्माण करण्यात आली आहे. म्हणूनच पुण्य कार्य केल्याने त्याला आत्मिक सुख-शांति प्राप्त होते. वाईट कृत्याने प्राप्त होत नाही. वाईट कृत्याने त्याचा आत्मा दुखावला जातो व त्याचा आत्मा विकृत व रोगग्रस्त होतो.

मनुष्याच्या सद्‌गुणी व दुर्गुणी होण्यात ही वातावरणाचा हाथ असतो. मात्र यात अधिक श्रेय त्याच्या शब्दांना असते. जोपर्यंत नियंत्रण नसते तोपर्यंत मनुष्याला पथभ्रष्ट होण्यापासून कोणीही थांबवू शकत नाही. नियंत्रण दोन प्रकारचे असतात. उच्च विचार व उच्च आदर्शांचा आदर व समाज आदिंच्या प्रतिष्ठेची जाणीव. म्हणून आचरणाच्या शुद्धते व रक्षणासाठी शिक्षण व योग्य पालनपोषणाचे विशेष महत्व आहे.

५) ईश्वरप्राप्तिचे सुलभ व सहज साधन (मार्ग) आहे ईश्वराचे गुणगान करणे व त्याचे नाम:स्मरण करणे. त्याच्या आदेशांचे मनापासून पालन करणे. स्वत:ला त्याच्यासमोर समर्पित करायला हवे. मन व शरीरास शुद्ध व स्वच्छ ठेवायला हवे. त्याच्या प्रसन्नतेला जीवनाचे लक्ष्य मानले पाहिजे. त्याच्या अस्तित्वाच्या जाणिवेने, त्याच्या मनन व चिंतनाने आत्म्यास तल्लीन करायला हवे. अशा प्रकारच्या साधनेने असा आत्मिक आलोक प्राप्त होईल की, ज्या द्वारे आपल्या आत्म्यास हवे असलेले सुख संतोष प्राप्त होईल.

सारांश ईश्वर व ईश्वरीय गुणांचे स्मरण, चिंतन, त्याच्या वरील श्रद्धा, आत्म्याचे शुद्धीकरण, ईश्वरीय आदेशांचे पालन, जनसेवा, ईश्वराच्या प्रसन्नतेची चिंता, त्याची उपासना इत्यादि सर्व बाबी ईश-प्राप्तिची स्वाभाविक साधने (मार्ग) तर आहेतच त्यापेक्षा त्यांच्या आधारे मानव जीवनास उत्तम स्वरुप प्राप्त होण्याची शक्यता आहे. त्याच्या विनाजीवन नीरस व निरर्थक होते. ईश्वर प्राप्ती आपल्या जीवनाचे सर्वात कोमल पक्ष आहे. मात्र हा पक्ष तेवढाच सशक्त आहे. याच्या आधाराने जीवनात वास्तविक सौंदर्य व माधुर्य निर्माण होते व मानवाला मानसिक दृढता प्राप्त होते.

*** समाप्त ***